


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# भाषा आणि जीवन

मराठी : अभ्यास : परिषद : पत्रिका

वर्ष २३ । अंक २ । उन्हाळा २००५

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका



चित्रकल्पना व अक्षर-निर्मिती : विनय सायनेकर; दृश्य संकल्पन व संगणकसाहाय्य : सुप्रिया खारकर

**संपादक :** प्र.ना. परांजपे
**संपादन-समिती :** प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी
**संपादन सल्लागार :** अशोक रा. केळकर, गं.ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७. दूरध्वनी (०२०) २५६९४६१७
**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२. दूरध्वनी (०२०) २४४८६०१५
**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, २७१, नारायण पेठ, पुणे ४११ ०३०.

सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.
(२) या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तसेच मैसूर येथील भारतीय भाषासंस्थान यांचेही अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन, तसेच भारतीय भाषासंस्थान सहमत असतीलच असे नाही.

**या अंकाचे मूल्य रु. २५/-**

संपादकीय

# मराठीच्या विकासाच्या दिशा : ३ भाषिक पाहाणी

सर जॉर्ज ए. ग्रिअर्सन (१८५१- १९४१) यांनी भारतीय भाषांची पाहाणी केली ती १८९४ ते १९२८ या काळात. त्या पाहाणीचा अहवाल १९ खंडांत प्रकाशित झाला. त्यातला सातवा खंड मराठीचा आहे. तो इ.स. १९०५ मध्ये प्रसिद्ध झाला. म्हणजे त्या गोष्टीला शंभर वर्षे पूर्ण होत आहेत. मराठीतील पहिले मुद्रित पुस्तक १८०५ मध्ये प्रसिद्ध झाले. ब्रिटिशांच्या सुमारे अडीचशे वर्षांच्या काळात भाषेच्या विकासाला चालना देणाऱ्या या दोन घटना शंभर वर्षांच्या अंतराने घडल्या. त्यानंतरच्या गेल्या शंभर वर्षांच्या काळात त्या दोन घटनांशी तुलना करता येईल अशा किती घटना घडल्या — भारताची स्वातंत्र्यप्राप्ती आणि मराठी राज्यभाषा असणाऱ्या महाराष्ट्र राज्याची स्थापना होऊनही ?

भाषिक पाहाणीचाच मुद्दा घेऊ. भाषेची सद्य:स्थिती, तिच्या पोटभाषा/बोली इत्यादींची क्षेत्रे, त्यांच्या भाषकांची संख्या, त्यांची वैशिष्ट्ये याच्याबद्दल ठोस आकडेवारी नाही. प्रत्येकजण 'अंदाजपंचे धागोदरसे' या न्यायाने आकडे मांडत असतो आणि त्यांच्या भुसभुशीत पायावर आपल्याला आवडणाऱ्या सिद्धांताचे इमले उभारत असतो. प्रमाणभाषा म्हणजे काय हे समजाऊन न घेताच काही लोक तिला झोडपत सुटतात आणि ती फक्त साडेतीन टक्के उच्चभ्रू लोकांची भाषा आहे अशी हाकाटी करतात, तसेच हे आहे.

मराठीबद्दलचा खंड तयार करताना स्टेन कोनोव या नॉर्वेनियन भाषाशास्त्रज्ञाचे सहकार्य ग्रिअर्सनना लाभले होते. या खंडात मराठीचे ९४ नमुने आलेले आहेत. त्यांपैकी ८३ सलग मराठी क्षेत्रांतील असून उरलेले पूर्वेच्या सरहद्दीबाहेरचे आहेत. पाहाणीमध्ये त्यांचे वर्णन 'भग्न', 'संमिश्र' अशा संज्ञांनी केले आहे. आपले काम शक्य तितके प्रातिनिधिक व्हावे म्हणून ग्रिअर्सननी काळजी व मेहनत घेतली होती. गोळा केलेल्या नमुन्यांत क्षेत्रीय, जातीय, व्यावसायिक, धार्मिक असे सर्व प्रकार आहेत. झ्यूल ब्लॉक या फ्रेंच भाषाशास्त्रज्ञाच्या मराठीसंबंधीच्या प्रबंधाचा आधार हा खंड आहे.

ग्रिअर्सन यांनी केलेल्या पाहाणीलाही काही मर्यादा होत्या. तिच्यात हैदराबाद, म्हैसूर, त्रावणकोर, कोचीन आणि (तत्कालीन) मद्रास प्रांत यांचा समावेश नव्हता.



अनुक्रमणिका

त्यामुळे या पाहाणीत दक्षिणी भाषा (कन्नड, तेलगू, तमीळ, मल्याळम् इ०) वगळल्या गेल्या. आधी प्रादेशिक अधिकाऱ्यांकडून माहिती मागवण्यात आली, नंतर पाहाणीची केंद्रे निश्चित करण्यात आली. त्यानंतर शिक्षकांमार्फत नमुने मागवण्यात आले. शिक्षक हे नमुने आपल्या किंवा स्थानिक लिपीत लिहून पाठवीत. या पद्धतीतही अनेक त्रुटी दाखवता येतील. प्रत्यक्ष प्रत्येक स्थळावर जाऊन नमुने गोळा करणे, एकाच अधिकारी व्यक्तीने सर्व नमुने गोळा करणे अधिक शास्त्रशुद्ध ठरले असते. मात्र पाहाणीचा विस्तार व व्याप बघता ते शक्य नव्हते हे आपल्याला मान्य करावे लागते. उपलब्ध नमुन्यांची तुलना करता यावी म्हणून बायबलमधील उधळ्या मुलाची गोष्ट त्या त्या भाषेच्या प्रमाणरूपात लिहून घेण्यात आली होती. याशिवाय २१६ शब्दांच्या व वाक्यांच्या याद्या वापरून नमुन्यांतील उणिवा भरून काढण्याचा प्रयत्न करण्यात आला. त्यामध्ये नाती, शरीरावयव, नित्योपयोगी पदार्थ, नित्य परिचयाची झाडेझुडपे, पशुपक्षी, आवश्यक क्रियापदे या सर्वांसाठी असलेले शब्द व उपयुक्त वाक्ये यांचा समावेश होता.

या पाहाणीवर त्या काळात टीका झाली. पण नंतरच्या १०० वर्षांत अनेक देशी व विदेशी पंडितांनी आपला अभ्यास, संशोधन व त्याचे निष्कर्ष यांमधून या पाहाणीच्या वस्तुस्थितीनिदर्शकतेची, उपयुक्ततेची व श्रेष्ठत्वाची पावती दिली. भाषावार प्रांतरचनेच्या वेळी आद्य पुरावा म्हणून या पाहाणीलाच प्राधान्य द्यावे लागले.

या भाषिक पाहाणीचे मूळ पाहणेही उपयुक्त आहे. १८८६मध्ये व्हिएन्नाला भरलेल्या प्राच्य विद्या परिषदेत ग्रिअर्सनने या पाहाणीचा मसुदा मांडला. (जन्माने आयरिश असलेल्या ग्रिअर्सननी डब्लिनच्या ट्रिनिटी महाविद्यालयात 'भारतीय भाषांचा अभ्यास' करून आणि १८७३ मध्ये 'इंडियन सिव्हिल सर्विस' ही परीक्षा पार करून भारतात १९०३ पर्यंत विविध अधिकारपदांवर काम केले.) प्राच्य विद्या परिषदेने ग्रिअर्सनच्या मसुद्याची शिफारस हिंदुस्थान सरकारला केली आणि त्यानंतर १८९४ मध्ये पाहाणीचे काम सुरू झाले. 'जगातील सर्वात प्रचंड भाषिक पाहाणी' असे तिचे वर्णन संस्कृति-कोशाने केले आहे.

यानंतरच्या १०० वर्षांत भाषिक पाहाणीचा विचार कुणाला सुचला नाही असे नाही. १९५४ ते १९५९ पर्यंत भारतात रॉकफेलर फौंडेशनचा प्रकल्प चालू होता. त्या वेळी भारत सरकारला पाहाणीचा विषय सुचला. त्यासाठीचे प्रारूप डॉ. सुमंत कत्रे यांनी सरकारला सादर केले. पण निदान दोन सरकारी खात्यांमधील [शिक्षण व गृह (जनगणना)] ओढाताण, प्रचंड आर्थिक तरतूद, अधिकाऱ्यांमधील चढाओढ आणि या क्षेत्रातील तज्ज्ञांचे डाव-प्रतिडाव यांमुळे हा प्रकल्प सुरू होऊ शकला नाही.

महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेनंतर निदान महाराष्ट्राची भाषिक पाहाणी करण्याचे ठरले. डॉ. कत्र्यांच्या मार्गदर्शनाखाली काम सुरू झाले. एक वर्ष चालले. नंतरच्या वर्षात अंदाजपत्रकात या पाहाणीसाठी आर्थिक तरतूद करण्यास सरकार विसरले ! साहजिकच प्रकल्प बंद झाला.

राज्य मराठी विकास संस्थेला अशा पाहाणीचे महत्त्व कळत नाही का ? त्यासाठी प्रयत्न करण्याची आवश्यकता त्यांना भासत नाही का ? सरकारने, सरकारचा आर्थिक पाठिंबा असलेल्या संस्थांनी यासाठी पुढाकार घेतला नाही तर अशी पाहाणी कशी होणार ? ती जोपर्यंत होत नाही तोपर्यंत आहेच आपणा सर्वांचे 'अंदाजपंचे धागोदरसे'. ■

**प्र. ना. परांजपे**

**सूचना फलक**

**पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन**

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्या संबंधी वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम, कलम डी १९(बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४, यांना अनुसरून केलेले निवेदन.

१) **प्रकाशन स्थळ :** पुणे, महाराष्ट्र
२) **प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक,** जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर.
३) **मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** नीलिमा गुंडी, भारतीय,
**पत्ता :** ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र.५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२.
४) **मुद्रणस्थळ :** भंडारी मुद्रणालय, २७१ नारायण पेठ, पुणे ४११ ०३०.
५) **प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता पत्ता :** नीलिमा गुंडी, भारतीय, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद, पत्ता : कलम ३प्रमाणे
६) **संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** प्र.ना. परांजपे, भारतीय,
**पत्ता :** सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७.

मी नीलिमा गुंडी असे प्रतिज्ञापूर्वक सांगते की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

**नीलिमा गुंडी** (प्रकाशक)

# पहिले पाऊल

वाग्वैजयंती

मराठी भाषेतलं पहिलं पुस्तक 'अ ग्रामर ऑफ दी मराठा लँग्वेज' इसवी सन अठराशे पाचमधे छापलं गेलं. या घटनेला या वर्षी दोनशे वर्षे होत आहेत. मराठी भाषेच्या इतिहासातली महत्त्वाची घटना. ख्रिस्ती मिशनरी विल्यम कॅरी हा या ग्रंथाचा कर्ता. पहिलं मराठी पुस्तक छापलं गेलं बंगालमधल्या श्रीरामपूर गावी, मिशनच्या छापखान्यात. या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीत मराठी मजकुरासाठी देवनागरी, तर दुसऱ्या आवृत्तीत मोडी ठसे वापरले आहेत. देवनागरी तेव्हा ग्रंथ व्यवहाराची लिपी होती आणि मोडी रोजच्या व्यवहाराची. पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत कॅरीने मोडी ठसे उपलब्ध नसल्याबद्दल दिलगिरी व्यक्त केली आहे.

विल्यम कॅरी हा भारतीय प्रबोधनाचा महत्त्वाचा घटक. १७९३मध्ये त्याचे पाय भारताच्या किनाऱ्याला लागले. या घटनेला दोनशे वर्षे झाली तेव्हा त्याच्या स्मृतिप्रीत्यर्थ भारतीय टपाल खात्यानं तिकीट काढलं होतं. कमालीच्या गरिबीतून वर आलेल्या विल्यम् कॅरीचं औपचारिक शिक्षण फारसं झालं नव्हतं. इंग्लंडमध्ये असताना चरितार्थासाठी तो चांभारकाम करत असे. भारतात आल्यावरही सुरवातीच्या काळात त्यानं हालात दिवस काढले. लाखो हिंदूंच्या हाती त्यांच्या भाषेतून बायबल देण्याच्या कल्पनेनं त्याला झपाटलं होतं. मालदा इथं निळीच्या मळ्यावर तो काम करत होता. या मळ्याच्या मालकानं कॅरीला इंग्लंडहून आलेली छापखान्याची यंत्रसामग्री विकत घेण्यासाठी मदत केली. देशी भाषांमध्ये छपाई करण्याच्या धडपडीची ही सुरुवात. पुढं कॅरी जेव्हा श्रीरामपूर मिशनमध्ये दाखल झाला तेव्हा त्यानं हा छापखाना श्रीरामपूरला नेला.

मुद्रणकलेच्या आरंभकाळातील ही पुस्तकं म्हणजे दोलामुद्रिते. अ. का. प्रियोळकरांनी घडवलेला हा शब्द. इंग्लिशमध्ये Incunabula (एखाद्या गोष्टीच्या विकासातील प्रारंभीचे टप्पे) असा शब्द आहे. Cunae या लॅटिन शब्दाचा अर्थ पाळणा किंवा दोला. पाळण्यातलं मुद्रण म्हणून दोलामुद्रण. विल्यम कॅरीसाठी ठसे बनवण्याचे काम पंचानन कर्मकार नावाच्या कारागिरानं केलं. हा पंचानन कोलकत्याला चार्ल्स विल्किन्सच्या छापखान्यात नोकरीला होता. भारतीय भाषांचे पहिले ठसे तयार करण्याचं श्रेय चार्ल्स विल्किन्सचं आहे. कॅरीनं पंचाननला आपलं काम बघायला

श्रीरामपूरला बोलावलं आणि डॅनिश मिशनच्या मदतीनं तिथंच ठेवून घेतलं.

विल्यम कॅरी कोलकत्याच्या फोर्ट विल्यम कॉलेजमध्ये संस्कृत, बंगाली आणि मराठी या भाषांचा प्राध्यापक होता. मराठी व्याकरणाच्या रचनेत त्याला फोर्ट विल्यम कॉलेजमधल्याच पंडित वैजनाथ शास्त्री या नागपूरकडच्या मराठी माणसाची मदत झाली, असं त्यानं नमूद केलं आहे. या पुस्तकाच्या प्रस्तावनेत विल्यम कॅरीनं म्हटलं आहे, की मराठी भाषक प्रदेशाच्या सीमा दक्षिणेला विजापूरपासून उत्तरेला उज्जैनपर्यंत, पश्चिमेला गुजरातसह महाराष्ट्र आणि पूर्वेला बंगाल, बिहार, ओरिसापर्यंत आहेत. या पुस्तकाच्या परिशिष्टात रोजच्या व्यवहारात उपयोगी पडतील असे संवाद दिले आहेत, ते वाचून आज करमणूक होते. विल्यम कॅरीची ज्ञानाची भूक आणि कामाचा झपाटा जबरदस्त होता. त्यानं करून ठेवलेलं काम थक्क करणारं आहे. किमान छत्तीस भाषांमध्ये त्यानं बायबलचं भाषांतर केलं. मराठीच्या व्याकरणानंतर त्यानं मराठी - इंग्रजी शब्दांचा कोश तयार केला. त्यानं धडपड करून पहिला देवनागरी फॉन्ट विकसित केला. त्यानं लिहून ठेवलं आहे, की 'माझ्या मृत्यूनंतर माझी नोंद 'एक भटक्या' म्हणून व्हावी.' ■

[पूर्वप्रसिद्धी : 'दै. सकाळ', २.१.०५, पृ. ७]

## सूचना - फलक

१. पुढील विषयांसंबंधीचे लेखन ''भाषा आणि जीवन''ला हवे आहे : मराठी व अन्य देशी-विदेशी भाषा, भाषाविज्ञान, भाषांतर, संशोधन, शैली, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय इ. धोरणे, 'भाषा आणि जीवन''मधील लेखांसंबंधीच्या प्रतिक्रिया, पानपूरके.

२. लेखकांनी पुढील पथ्ये पाळावीत :
(अ) कागदाच्या एकाच बाजूस, सुवाच्य लिहावे. (आ) लेखनाच्या पाकिटावर पुरेशी टपाल-तिकिटे लावावीत. (इ) लेखाच्या अखेरीस स्वत:ची ओळख (व्यवसाय इ०) एकदोन वाक्यांत लिहावी. त्याचप्रमाणे स्वत:चा पत्ता व (इष्ट वाटल्यास) दूरध्वनी क्रमांक द्यावा. (संपादकांच्या सोयीसाठी दूरध्वनी क्रमांक जरूर कळवावा.) (उ) लेखात इंग्रजी अवतरणांचे मराठी भाषांतर द्यावे. व्यक्तिनामे, ग्रंथांची व लेखांची शीर्षके इ० देवनागरीत लिहावी. (अतिशय अपरिहार्य अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा.)

३. लेखनासंबंधीचा निर्णय एक ते तीन महिन्यांत कळवला जातो. टपाल तिकिटे जोडलेली असतील तर (आणि तरच) नापसंत लिखाण परत पाठवले जाते.

# सामाजिक भाषाभेद आणि भाषिक परिवर्तन


## विल्यम ब्राइट, ए. के. रामानुजन

भाषांतर : विवेक भट आणि मिलिंद मालशे



[मूळ इंग्लिश लेख : ब्राइट, विल्यम व ए.के. रामानुजन, १९७२. 'सोश्योलिंग्विस्टिक व्हेरिएशन अँड लँग्वेज् चेंज्'. (समाविष्ट) प्राइड, जे.बी. व जॅनेट् होम्झ (संपा०) १९७२, **सोश्योलिंग्विस्टिक्स : सिलेक्टिड् रीडिंग्झ.** हार्मंड्झ्वर्थ मिडलसेक्स : पेंग्विन, पृष्ठ १५७-१६६]

[इंग्लिश लेखाचे मूळ प्रकाशन : 'प्रोसीडिंग्झ ऑफ द नाइन्थ इंटरनॅशनल कॉंग्रेस ऑफ लिंग्विस्टस', संपा० होरस हंट्. द हेग् : मूटॉं, पृष्ठ ११०६-१३]


**प्रास्ताविक**

भाषांच्या वर्णनात्मक व्याकरणावरून आपली अशी समजूत झालेली असते की भाषा ही अखंड, वज्ररूप अशी एखादी गोष्ट असते. परंतु ही समजूत बहुतांशी चुकीची आहे. जेथे भाषाविषयक साधनसामग्री पुरेशी उपलब्ध असते तेथे स्वनिमव्यवस्था, व्याकरण आणि शब्दनिधी अशा सर्वच स्तरांवर भाषेमध्ये विविधता आढळून येते. या विविधतेचा एककालिक अभ्यास भौगोलिक, सामाजिक आणि शैलीविषयक अशा तीन दृष्टिकोणांतून करता येतो. त्यांपैकी भौगोलिक दृष्टिकोण हा अर्थातच प्रमुख असून त्याने बोलीभाषातज्ज्ञांचे नेहमी लक्ष वेधून घेतले आहे आणि बोलींच्या नकाशा-संग्रहाच्या स्वरूपात त्यांनी तो मांडलेलाही आहे. भाषेमध्ये जे इतर फेरबदल होत असतात त्याच्याकडे अभ्यासकांचे त्या मानाने काहीसे दुर्लक्ष झालेले आहे. सामाजिक परिस्थितीनुसार भाषेत होणारी परिवर्तने असे जेव्हा आपण म्हणतो तेव्हा ती परिवर्तने ही बोलणारी, ऐकणारी आणि जिला अनुलक्षून बोलले जाते ती, अशा सर्व व्यक्तींच्या सामाजिक स्वत्वाशी निगडित असतात. याची काही समर्पक उदाहरणे पुढीलप्रमाणे. नुट्का या (अमेरिकन इंडियन) भाषेमध्ये लहान मुलांशी/मुलांबद्दल किंवा स्थूल, बुटक्या, कुबड असणाऱ्या लोकांशी/लोकांबद्दल बोलताना काही विशिष्ट भाषिक रूपे वापरली जातात. (Sapir, 1915) कौसाटी भाषक पुरुष आणि स्त्रिया यांचे बोलणे खूपच भिन्न असते. (Haas, 1944) तसेच आपल्या (पाश्चात्य) समाजातही बोलणाऱ्या व्यक्तीच्या समाजातील दर्जानुसार तिच्या बोलण्यामध्ये फेरबदल कसे घडून

येतात हे आपल्या नित्य परिचयाचे आहे. त्या व्यतिरिक्त असेही काही भाषांतर्गत भेद आपल्याला दिसून येतात की जे केवळ बोलणाऱ्या व्यक्तींच्या समाजातील दर्जाशीच नव्हे तर इतर सामाजिक घटकांवरही अवलंबून असतात. त्यांना आपण शैलीनुसार होणारे भेद असे म्हणू. या सर्वच भेदांना उद्देशून ''सामाजिक भाषाभेद'' ही संज्ञा वापरता येईल. आता या शैलीनुसार होणाऱ्या भाषाभेदांची कक्षा एखाद्या आदिवासी टोळीच्या युद्धघोषणांपासून (Opler and Hoijer, 1940) ते थेट अगदी आपल्या सुशिक्षित समाजातील लेखनविषयक विशिष्ट शैलीपर्यंत, अशी विस्तृत स्वरूपाची असू शकते. आपल्या औपचारिक आणि अनौपचारिक बोलण्यामध्ये जो भेद दिसतो त्याचाही समावेश यात होतो. हा भेद जगातील बहुतेक सर्वच भाषांमध्ये आढळतो हे खरे असले तरी अरेबिक किंवा आधुनिक ग्रीक यांसारख्या भाषिक समाजांमध्ये तो भेद एवढा मोठा आहे की त्याला जणू एखाद्या बोली-द्विभेदाचे स्वरूप येते. फर्गसन् (१९५९) यांनी त्याला ''कार्यनिष्ठ बोलीद्विभेद'' (डायग्लॉसिया) असे नाव दिले आहे.

सामाजिक भाषाभेदांचे प्रकार अभ्यासणे दक्षिण आशियाई देशांच्या (भारत, पाकिस्तान, श्रीलंका) बाबतीत विशेष फलदायी ठरते. या विषयाच्या विविध पैलूंशी संबंधित असा एक ग्रंथ उपलब्ध झालेला आहे. (Ferguson and Gumperz, 1960) या ग्रंथावरून असे दिसते की एका बाजूला सुस्पष्ट असे सामाजिक बोलीभेद हे हिंदू समाजातील वर्णव्यवस्थेशी संबंधित आहेत आणि या वर्ण-बोलींचा अभ्यास हे संशोधनाचे एक महत्त्वाचे क्षेत्र ठरते. दुसऱ्या बाजूने असेही दिसते की भारतातील बऱ्याचशा भाषांमध्ये औपचारिक व अनौपचारिक बोलण्यामधील भेद हा (कार्यनिष्ठ) बोली-द्विभेद म्हणावा इतक्या ठळकपणे दिसून येतो. मात्र दक्षिण आशियाई भाषांसंबंधी प्रकाशित झालेल्या बहुतेक संशोधनामध्ये प्रामुख्याने उच्च-वर्णीय समाजाच्या बोली किंवा औपचारिक शैली यांवरच भर दिलेला आढळतो, आणि त्यामुळे वर्ण-बोलींमधील भेद आणि बोली-द्विभेद यांच्यावर, तसेच त्यांच्या परस्परसंबंधांवर, अभ्याससामग्री अजून तरी फारशी उपलब्ध नाही.

दक्षिण भारतातील द्रविड कुळातील भाषांमध्ये सामाजिक घटकांचा भाषेवरील परिणाम किमान दोन परस्परविरोधी प्रकारांमध्ये विभागलेला दिसून येतो. तमिळ व कन्नड या भाषांमध्ये (बहुधा तेलगू व मल्याळम या भाषांमध्येसुद्धा) बोली-द्विभेदाची अगदी ठळक उदाहरणे आहेत. सुशिक्षित लोक लेखनात व सार्वजनिक भाषणांत शिष्टसंमत वा साहित्यिक शैली वापरतात, आणि बोलणाऱ्याचा समाजातील वर्ग किंवा त्याचे मूळ भौगोलिक स्थान यांनुसार त्याच्या शैलीत फारसा फरक पडत नाही. याउलट

लोकांच्या अनौपचारिक किंवा नेहमीच्या व्यवहारातील बोलण्यामध्ये अंतर्गत विविधता बऱ्याच अधिक प्रमाणात आढळते. मूळ गाव आणि वर्ण यांच्याशी निगडित असे भाषाभेद या अनौपचारिक बोलण्यामध्ये ठळकपणे जाणवतात. मात्र त्यातही अशिक्षितांच्या मानाने सुशिक्षितांची बोली ही बरीचशी एकसारखी असते, असे म्हणता येईल.

दक्षिण भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील एका लहानशा भागात राहणाऱ्या तुळू भाषिक समाजात आणि किनाऱ्यापासून थोड्या आत असलेल्या कोडगू (कुर्ग) भाषिक समाजात एक अगदी वेगळाच प्रकार आढळतो. या भागातील हिंदू समाज हा उर्वरित दक्षिण भारतातील हिंदू समाजासारखाच आहे; परंतु लिखित साहित्याची परंपरा त्यांच्या भाषांना नाही. अनौपचारिक किंवा वैयक्तिक व्यवहारामध्ये तुळू भाषा ही कधी कधी कन्नड लिपीतून लिहिली जाते हे खरे. परंतु तिला साहित्यिक परंपरा म्हणावी अशी काही नाही आणि शिक्षणाचे रूढ माध्यम म्हणूनही तुळू भाषा कधी वापरली जात नाही. दक्षिण भारतात इतरत्र सामाजिक कार्यामध्ये किंवा समारंभामध्ये त्या त्या प्रदेशातील औपचारिक भाषेचा उपयोग केला जातो. तशाच प्रकारच्या कार्यामध्ये येथे (तुळू आणि कोडगू भाषकांमध्ये) कन्नड भाषेच्या शिष्ट बोलीचा उपयोग करतात. मात्र एरवी नेहमीच्या व्यवहारातील अनौपचारिक शैलीचा प्रदेशानुसारी आणि वर्णानुसारी भेद जसा कन्नड व तमिळ भाषांमध्ये दिसतो, तसा तो तुळू भाषेतही दिसून येतो.

आता असा प्रश्न उपस्थित होतो की आधुनिक काळातील वर्ण-बोलीमध्ये जे भेद दिसतात ते कोणत्या व कशा प्रकारच्या प्रक्रियांतून निर्माण झाले आहेत. आजच्या बोलीमधील रूपांची तुलना पूर्वकालीन द्रविड भाषांतील रूपांशी केल्यास असे दिसते की पूर्वीच्या रूपांपैकी काही रूपे आजच्या भाषेत कायम राहणे, तर काही रूपांत विकार होणे, अशा प्रक्रिया घडलेल्या दिसतात. भाषेमधील विकारप्रक्रिया सामान्यत: समाजाच्या खालच्या स्तरातून येत असते, असे कधी कधी म्हटले जाते. एका फ्रेंच शोधनिबंधामध्ये असे म्हटले आहे की ''लोकभाषा ही अधिक नवनिर्मिती करीत असते आणि तिच्या भाषकांची संख्याही अधिक असते तर सुखवस्तू वर्गाची भाषा अधिक सनातनी स्वरूपाची असते.''(Schogt, 1961:91) या उलट कधी असाही युक्तिवाद केला जातो की स्वनविषयक बदलाची, किंवा कदाचित सगळ्याच भाषांबदलाची प्रक्रिया ही समाजाच्या वरच्या स्तरातील लोक सुरू करतात कारण निम्न स्तरातील लोकांपासून आपली प्रतिष्ठा त्यांना वेगळी राखायची असते(Joos, 1952:229). अभिजनांचे अनुकरण करून इतरेजन ही भाषेतील दरी बुजवू पाहतात, त्याच दरम्यान अभिजन

पुन्हा आणखी काही बदल घडवून आणायला उद्युक्त होतात, असे मानले जाते. भाषिक बदल म्हणजे ''अभिजनांचा हेवा करणाऱ्या असंख्य इतरेजनांनी नेटाने प्रदीर्घ काळ केलेले त्यांचे अनुकरण आणि त्यातून अभिजनांनी काढलेली पळवाट'' असे वर्णन काहींनी केलेले आहे. (Fischer, 1958:52) भारतातील वर्ण-बोलीविषयी उपलब्ध असलेल्या माहितीवरून अशा दृष्टिकोणांचा पडताळा घेता येतो. कन्नड आणि काही प्रमाणात तुळू भाषांमधील उपलब्ध साधनांचा काळजीपूर्वक अभ्यास काही वर्षांपूर्वी केला गेला (Bright, 1960a, 1960b) तेव्हा पुढील निष्कर्ष काढण्यात आले :

(१) भाषाबदलांकडे केवळ बदल म्हणून पाहणे पुरेसे नाही, तर स्वनिमव्यवस्था, व्याकरण व शब्दनिधी या सर्वांमधील बदल, तसेच उसनी घेतलेली आणि देश्य सामग्री, असे त्या बदलांचे वर्गीकरणही केले पाहिजे.

(२) कन्नड ब्राह्मणांची बोली आणि ब्राह्मणेतर मध्यम वर्णीयांची बोली यांची तुलना केली असता असे दिसले की ब्राह्मणांच्या बोलीमधील बदल हे उसन्या घेतलेल्या शब्दांच्या आणि स्वनिमव्यवस्थेच्या तसेच अर्थबदलाच्या बाबतीत अधिक आहेत. म्हणजेच हे बदल जाणीवपूर्वक केलेले बदल अशा पातळीवर आहेत. याउलट ब्राह्मणेतरांच्या बोलीतील बदल हे देश्य स्वनिमव्यवस्था आणि पदिमव्यवस्था यांच्या बाबतीत म्हणजे एक प्रकारे अजाणता घडलेले बदल अशा पातळीवर आहेत.

(३) परंतु अशाच प्रकारचे सर्वेक्षण तुळू भाषेच्या बाबतीत केले तेव्हा ब्राह्मण व ब्राह्मणेतरांच्या बोलीतील बदल हे स्वनिमव्यवस्थेच्या दृष्टीने पाहता सारख्याच प्रमाणात झालेले दिसले. तुळू भाषेतील अन्य प्रकारच्या बदलांचा अभ्यास करण्यासाठी पुरेशी साधनसामग्री उपलब्ध झाली नाही.

कन्नड आणि तुळू भाषांच्या सर्वेक्षणात दिसलेल्या या फरकाचे कारण स्पष्ट करण्यासाठी असा एक विचार मांडण्यात आला की कन्नड भाषेची व विशेषतः लेखनाची औपचारिक शैली मुळातच अस्तित्वात असल्यामुळे कदाचित असे घडले असेल. म्हणजेच कन्नड ब्राह्मणांमधील शिक्षणाचा अधिक प्रसार हा बोलीतील बदलाच्या प्रवृत्तीला प्रतिबंध करणारा असला पाहिजे. बोलीतील बदल हे सामान्यतः नकळत असे घडत असतात; परंतु लिखित किंवा साहित्यिक भाषेचे ठाम असे व्याकरण (म्हणजे रूपव्यवस्था आणि वाक्यव्यवस्था) आणि स्वनिमव्यवस्था यांच्यामुळे बदलाच्या प्रकियेचा वेग कमी होतो. तुळूमध्ये लेखनाची परंपराच नसल्यामुळे तुळू ब्राह्मणांच्या बोलीवर असे काही नियंत्रण नाही, आणि म्हणून त्यांच्या बोलीत घडून येणारे बदल हे ब्राह्मणेतरांच्या बोलीतील बदलांसारखेच असतात. तेव्हा, सर्वसामान्यपणे असे

म्हणता येईल की मानवी समाजात जेथे शिक्षणाचा प्रसार अधिक आहे तेथे तो भाषाबदलाच्या प्रक्रियेवर अंकुश ठेवीत असतो. लॅटिन भाषेसंबंधात अलीकडेच करण्यात आलेल्या एका अभ्यासावरून या विधानाला पुष्टी मिळाली आहे. लॅटिनमधील कायदाविषयक पारिभाषिक शब्दांत गेली दोन हजार वर्षे जवळ जवळ काहीच बदल झालेला नाही, ही एक असामान्य गोष्ट आहे. ज्या क्षेत्रात विचारविनिमयासाठी उच्च दर्जाचे शिक्षण ही मूलभूत आणि अत्यावश्यक स्वरूपाची गोष्ट आहे अशा क्षेत्रात ही पाहणी केली असल्यामुळे त्यावरून असा निष्कर्ष काढलेला आहे की कालक्रमानुसार होणाऱ्या भाषाबदलाच्या संदर्भात उच्च शिक्षण ही गोष्ट लक्षात घेण्यासारखी असते. शिवाय उच्च शिक्षणामुळे शब्दनिधीतील बदलाचा वेग मंदावणेही अपेक्षित आहे. (Zengel, 1962:138-9)

भाषाबदलाच्या प्रक्रियेत शिक्षणाची भूमिका काय असते हे जास्त चांगल्या रीतीने सिद्ध करण्यासाठी दक्षिण आशियाई देशांतील वर्णबोलींचा अधिक अभ्यास करणे आवश्यक आहे, हे तर उघडच आहे. त्यासाठी तमिळमधील वर्णबोलींचा अभ्यास आम्ही केला कारण तमिळ भाषेला अत्यंत प्रदीर्घ अशी साहित्यिक परंपरा आहे. त्याचबरोबर तुळू भाषेविषयीची अभ्यासाची अधिक साधनेही आम्ही तपासली. त्यावरून या दोन भाषिक समाजांविषयी काही निष्कर्ष आम्हाला काढता आले. ते पुढील छेदकांमध्ये दिलेला आहेत.

**तमिळ**

लेखनाच्या पद्धतीवरून हे स्पष्ट दिसते की तमिळविषयक बहुतांश प्रकाशित संशोधन हे केवळ औपचारिक शैलीच्या अभ्यासापुरते मर्यादित आहे. व्यवहारातील तमिळ भाषेच्या विविध भौगोलिक आणि सामाजिक घटकांनुसार बदलणाऱ्या बोलींचा मागोवा विन्सन (१८९५), मॅथ्यूज् (१९४२) आणि ज्योतिमुथु (१९५६), या संशोधकांनी घेतला आहे. परंतु त्यांचा अभ्यास तितकासा पद्धतशीर नव्हता, आणि आपल्या निरीक्षणांची भौगोलिक व सामाजिक घटकांशी निश्चित स्वरूपाची सांगड त्यांना घालता आली नाही. त्यापेक्षा अधिक पद्धतशीर अभ्यास ब्लोख् (१९१०), शण्मुगम पिल्ले (१९६०), झ्वेलेबिल् (१९५९, १९६०, १९६१) आणि आम्ही (१९६२) केला आहे. परंतु तरीही आजवरचा या विषयाचा अभ्यास फारच वरवरचा आहे आणि त्यावरून तमिळ बोलींच्या संशोधनाविषयी काही सर्वसामान्य विधान करणे धोक्याचे ठरेल.

या मर्यादांची जाणीव ठेवूनसुद्धा तमिळच्या ब्राह्मणी आणि ब्राह्मणेतर बोलीची सर्वसामान्य वैशिष्ट्ये शोधण्याचा आणि प्रत्येक वैशिष्ट्याच्या संदर्भात या दोहोंपैकी

कोणता समाजगट बदल घडवून आणण्यास जबाबदार असतो, हे पाहण्याचा प्रयत्न आम्ही केला. बाह्मणी बोलीची माहिती आम्ही अय्यर आणि अय्यंगार समाजातील व्यक्तींकडून घेतली, तर ब्राह्मणेतर बोलीची माहिती वेल्लाळ, नाडर, चेट्टियार आणि ख्रिस्ती समाजातील व्यक्तींकडून घेतली. या संशोधनासाठी आवश्यक असणारा ऐतिहासिक दृष्टिकोण आम्हाला पुढील तीन प्रकारच्या संशोधनातून मिळाला :

(१) तमिळच्या साहित्यिक रूपाचा अभ्यास (तमिळच्या बाबतीत साहित्यिक रूप हे नेहमीच नसले तरी बहुधा व्यावहारिक रूपापेक्षा पूर्वकालीन असते.) (२) बरो व एमनो (१९६१) यांनी अभ्यासिलेले अन्य द्रविड भाषांतील समकुलीन शब्द; आणि (३) उसन्या घेतलेल्या शब्दांची मूळ भाषांतील रूपे, तुलनेसाठी शब्दनिधी, स्वनिमव्यवस्था आणि पदिमव्यवस्था यांचा आम्ही अभ्यास केला; वाक्यव्यवस्थांची तुलना मात्र अजून व्हावयाची आहे.

तमिळ शब्दनिधीमध्ये (सामाजिक) वर्णानुसार होणाऱ्या भेदांचे वर्गीकरण दोन प्रकारे करता येईल.[१] (१) एका वर्णबोलीत शब्द उसना घेतलेला तर दुसऱ्या वर्णबोलीत देश्य शब्दाचा वापर : उदाहरणार्थ, ब्राह्मणी बोलीत /जलो/ 'पाणी' (संस्कृत शब्द जल), /तीरतो/ 'पिण्याचे पाणी' (संस्कृत शब्द तीर्थ), /तण्णी/ 'पिण्याचे सोडून इतर पाणी', तर ब्राह्मणेतरांच्या बोलीत /तण्णी/ म्हणजे कोणत्याही प्रकारचे पाणी. अन्य भाषेतून शब्द उसना घेऊन नवनिर्मिती करण्याची प्रवृत्ती बहुतांशी ब्राह्मणी बोलीत असल्याचे दिसते. मात्र याविरुद्ध उदाहरण म्हणजे 'पती' या अर्थी ब्राह्मणी बोलीत /अंबाडेयाँ/ असा शब्दप्रयोग आहे, तर ब्राह्मणेतरांच्या बोलीत /पुरुषे/ (संस्कृत शब्द पुरुष). (२) दोन्ही वर्णबोलीत देश्य शब्दांचा उपयोग : उदाहरणार्थ, 'झोप' या अर्थी ब्राह्मणी बोलीत /तुंगु/ तर ब्राह्मणेरांच्या बोलीत /ओरांगु/ असे शब्द आहेत. /तुंगु/ या शब्दाचा अर्थ ब्राह्मणी बोलीत 'टांगलेला असणे' (अकमर्क) असाही होतो, आणि मूळ अर्थ तोच असावा असे वाटते. तुलनेसाठी पाहा : या क्रियापदाचा सकर्मक प्रयोग /तूक्कू/ 'उचलणे' आणि कन्नड /तूगू/ 'वजन करणे'. ब्राह्मणेतरांच्या /ओरांगु/ या शब्दावर 'झोप' या अर्थाच्या साहित्यिक तमिळमधील /उरांकु/ या शब्दाची आणि अन्य द्रविड भाषांमधील शब्दांची छाप पडलेली दिसते. येथे ब्राम्हणी बोलीतील नवनिर्मिती ही अर्थबदलाच्या प्रक्रियेद्वारे झाली आहे, तर ब्राह्मणेतरांच्या बोलींत तसे झालेले नाही. याच्या विरुद्ध प्रकार आमच्या अभ्यासात तरी कोठे आढळला नाही. मात्र अशी काही उदाहरणे दिसली की दोन्ही बोलीत फरक आहे, परंतु त्यांतील एका बोलीने विशेष नवनिर्मिती केल्याचा पुरावा नाही. उदाहरणार्थ, 'धुणे' या अर्थी ब्राह्मणी बोलीतील /अलंबु/ आणि ब्राह्मणेतर बोलीतील

/कळुयु/ हे दोन्ही शब्द आदि-द्रविडमधील शब्दांवरून अर्थबदल न होता तसेच्या तसे आले असावेत असे दिसते.

ब्राह्मणी आणि ब्राह्मणेतर बोलींच्या स्वनिमव्यवस्थांची तुलनाही पुन्हा दोन प्रकारे विभागणी करून करता येईल. (१) उसने घेतलेले शब्द : ब्राह्मणी बोलीत मूळच्या शब्दांची परकीय स्वनिमव्यवस्था बहुतेक वेळा कायम राखलेली दिसते, तर ब्राह्मणेतरांच्या बोलीने ते शब्द देश्य स्वनिमव्यवस्थेत सामावून घेतलेले दिसतात. उदाहरणार्थ, 'स्वामी' हा संस्कृत शब्द ब्राह्मणी बोलीत /स्वामी/ तर ब्राह्मणेतरांच्या बोलीत /सामी/ किंवा /चामी/ अशा स्वरूपात दिसतो. तसेच ब्राह्मणी बोलीत उसन्या घेतलेल्या शब्दांत अवाजवी सुधारणा होण्याची शक्यता असते. उदाहरणार्थ, 'साखर' या अर्थी ब्राह्मणेतर /चीनि/ (हिंदी शब्द 'चीनी'वरून) म्हणतात तर ब्राह्मण /जीनि/ म्हणतात. 'केशकर्तन' या अर्थाचा 'क्रॉप्' हा इंग्लिश शब्द ब्राह्मणेतरांच्या बोलीत /क्राप्पु/ तर ब्राह्मणी बोलीत /क्राफु/ असा होऊन येतो. /ज्/ आणि /फ्/ हे परकीय ध्वनी ब्राह्मणी बोलीत चुकीने घुसविले गेले आहेत. (२) देश्य शब्दांच्या स्वनिमव्यवस्थांची तुलना : वर्णबोलीमधील फरकाची ठळक उदाहरणे म्हणजे जेथे ब्राह्मणी बोलीत अघोष /ऱ्/ आहे तेथे ब्राह्मणेतरांच्या बोलीमध्ये आणखी भेद दिसतात; उत्तरेकडील भागात /य/ तर दक्षिणेकडील भागात /ळ/ असा प्रकार दिसतो. उदाहरणार्थ, 'केळे' या अर्थी ब्राह्मणी बोलीत /वारेप्परो/ तर ब्राह्मणेतरांच्या बोलीत /वारेप्पोलो/, /वाळेप्परो/ आणि /वाळेप्पलो/ अशी रूपे दिसतात. समग्र चित्र असे दिसते की परकीय स्वनिमांचा अंतर्भाव करण्याच्या बाबतीत — कधी कधी तर व्युत्पत्तीवरून अनुमान करता येणार नाही अशा ठिकाणीसुद्धा — ब्राह्मणी बोलीत नवनिर्मिती होताना दिसते. या उलट ब्राह्मणेतरांची बोली देश्य शब्दांमध्ये नवनिर्मिती करीत असते. परिणाम मात्र असा होतो की निदान सुशिक्षितांच्या बोलण्यात शब्दांच्या जुन्या आणि नव्या स्वरूपांची बहुधा स्वैर सरमिसळ होते; जुन्या रूपांची जागा पूर्णत: नव्या रूपांनी घेतली आहे असे होत नाही.

ब्राह्मणी आणि ब्राह्मणेतर बोलींतील शब्दविचारसंबंधी फरक हे बहुधा पदिमांच्या विविध रूपांमधून दिसतात. परंतु त्या सर्वांचे स्पष्टीकरण स्वनिमांमधील नियमबद्ध संगती म्हणून करता येत नाही. उदाहरणार्थ, 'ते' (नपुं.प्र.ए.व.) हे सर्वनाम जर कर्ता असेल तर ब्राह्मण /-दु/ आणि ब्राह्मणेतर /वंदुचु/ असे पदिम वापरतात. म्हणून 'ते आले' या अर्थाने ब्राह्मण /वंदुदु/ तर ब्राह्मणेतर /वंदुचु/ असे म्हणतात. तमिळ साहित्यिक स्वरूप /वंततु/ असे आहे. ब्राह्मण व ब्राह्मणेतर दोहोंच्या बोलीत 'ते गेले' या अर्थाने /पोऽच्चु/ आणि 'ते (परिवर्तित) झाले/बनले' या

अर्थाने /आऽच्चु/ असे म्हणतात. साहित्यिक स्वरूपे अनुक्रमे /पोऽयिर्रु/ आणि /आऽयिर्रु/ अशी आहेत. सादृश्याच्या आधारे त्याची व्याप्ती वाढवून ब्राह्मणेतरांनी /वंदुच्चु/ हे रूप तयार केलेले दिसते. या आणि इतरही उदाहरणांवरून असे दिसते की देश्य शब्दांबाबत ब्राह्मणेतर बोलीच नवनिर्मिती करीत असते. अर्थात कोठे असेही दिसते की ब्राह्मणी आणि ब्राह्मणेतर दोन्ही बोलींनी नवनिर्मिती केली आहे; पण दोन भिन्न दिशांनी. उदाहरणार्थ, साहित्यिक तमिळमध्ये असणारा वर्तमानकाळाचा प्रत्यय /-किर्/ हा ब्राह्मणेतर बोलीमध्ये /-ह्/ असा होतो, तर ब्राह्मणी बोलीमध्ये /-र्/ असा होतो. 'तो करतो' या अर्थाने साहित्यिक तमिळमधील 'पण्णुकिराण्' हा शब्द ब्राह्मणेतरांच्या बोलीत /पन्नुहाँ/ तर ब्राह्मणी बोलीत /पणरा/ असा होतो. मात्र ब्राह्मणांच्या बोलीने नवनिर्मिती केली आहे आणि ब्राह्मणेतरांची बोली जुन्याला चिकटून राहिली आहे, असे एकही उदाहरण स्पष्टपणे निदर्शनास आले नाही.

यापूर्वी कन्नडच्या बाबतीत जशी परिस्थिती दिसली तशीच परिस्थिती तमिळ भाषेतील आजवर अभ्यासलेल्या साधनांवरून दिसून आली. संरचनेच्या कोणत्याही भागातील नवनिर्मितीबाबत ब्राह्मणी किंवा ब्राह्मणेतर बोली यांपैकी कोणत्याही एकीला एकाधिकार सांगता येणार नाही. तरीही काही प्रवृत्ती मात्र स्पष्टपणे ओळखता येतात. परकीय शब्द, परकीय स्वनिमव्यवस्था, आणि अर्थबदल यांचा प्रयोग करण्याकडे ब्राह्मणी बोलीचा कल अधिक असतो, तर ब्राह्मणेतर बोलीचा कल हा देश्य शब्दांची स्वनिमव्यवस्था आणि पदिमव्यवस्था यांच्यामध्ये बदल घडवून आणण्याकडे असतो.

**तुळू**

ब्रिगेल (१८७२), रामस्वामी अय्यर (१९३२अ, १९३२ब, १९३६) आणि कृष्णमूर्ती (१९५८) यांच्या प्रसिद्ध झालेल्या लेखनामध्ये तुळू भाषेसंबंधी सामग्री उपलब्ध आहे. दुर्दैवाने भौगोलिक भाषाभेदांचा स्वतंत्रपणे आढावा या साधनांत घेतलेला नाही, त्यामुळे भौगोलिक भाषाभेद व सामाजिक भाषाभेद वेगळे करणे कठीण झाले आहे. तीन तुळू भाषकांशी चर्चा करून ही समस्या काही प्रमाणात सोडविली आहे.

तुळूच्या ब्राह्मणी आणि ब्राह्मणेतर बोलींच्या तौलनिक अभ्यासाचे वर्गीकरण तमिळप्रमाणेच - म्हणजे उसने घेतलेल्या शब्दांतील बदल आणि देश्य शब्दांतील बदल अशा प्रकारे करता येते. उदाहरणार्थ, 'पति' या अर्थाने संस्कृतमधील 'पुरुष' या शब्दावरून ब्राह्मणी बोलीत /पुरुषे/ म्हणता तर ब्राह्मणेतरांच्या बोलीत /काण्डने/ असा शब्द आहे. हा शब्द तमिळमधील /काण्टन्/ आणि कन्नडमधील /गण्डा/ या शब्दांशी साधर्म्य सांगणारा आहे. देश्य शब्दांच्या बाबतीत फरकाचे उदाहरण म्हणजे 'मुलगी' या अर्थाने ब्राह्मण /जोऽवु/जेऽवु/ म्हणतात तर ब्राह्मणेतर/पोण्णु/

म्हणतात. /जोऽवु/जेऽवु/ या ब्राह्मणी बोलीतील रूपाचा अर्थ ब्राह्मणेतरांच्या काही बोलींमध्ये 'मूल' असा होतो. पारजी या भाषेमध्ये /चेऽपल/ तर ओल्लारी या भाषेत /सेऽपल/ म्हणजे 'मुलगा' याच्याशी हे ब्राह्मणी रूप पडताळून पाहता येईल. ब्राह्मणेतर बोलीतील /पोण्णु/ हे रूप तमिळमधील /पेन्/ म्हणजे 'स्त्री/मुलगी' याच्याशी साम्य दाखविते. ब्राह्मणी बोलीत अर्थबदल झालेला स्पष्टच आहे. दोन्ही ठिकाणी, शब्द संस्कृत/हिंदी/कन्नड मधून उसने घेऊन म्हणा किंवा देश्य शब्दांत अर्थबदल करून म्हणा, ब्राह्मणी बोलीच नवनिर्मिती करणारी दिसते.

स्वनिमांमधील नियमबद्ध संगती ही सुद्धा दोन प्रकारची असते. (१) काही ठिकाणी स्वनिमव्यवस्थाच उसनी घेतलेली असते. ब्राह्मणी बोलीतील महाप्राण स्फोटक ध्वनी हे ब्राह्मणेतर बोलीत अल्पप्राण स्फोटक ध्वनी असतात; उदाहरणार्थ, 'सुवास' या अर्थाने ब्राह्मणी बोलीत /गंध/ ( संस्कृत शब्द गंध ) तर ब्राह्मणेतर बोलीत /गंद्/ इतर काही ठिकाणी ब्राह्मणी बोलीतील महाप्राण रूपांचा उगम आदिद्रविड मध्ये — त्यात महाप्राण हे स्वनवैशिष्ट्य व्यवच्छेदक नसले तरी — शोधता येतो. उदाहरणार्थ,'थंड' या अर्थाने ब्राह्मणी बोलीत /छळि/ व ब्राह्मणेतर बोलीत /चळि/ अशी रूपे आहेत; तुलनेसाठी तमिळमध्ये /चळि/. अशा प्रकारच्या शब्दांमध्ये ब्राह्मणी बोलीतील महाप्राण हे अवाजवी सुधारित उच्चारांमुळे आले असावेत असे अनुमान करता येईल. (२) या प्रकारात देश्य स्वनिमव्यवस्थेचा समावेश होतो. उदाहरणार्थ, 'मिळालेले असणे' या अर्थाने ब्राह्मणी बोलीमधील /सिक्+/ या शब्दातील /स्/ हा स्वनिम, ब्राह्मणेतर बोलीमधील /तिक्क्-/ या शब्दातील /त्/ हा स्वनिम, आणि आदिद्रविडमधील /च्/ हा स्वनिम; तुलनेसाठी तमिळमधील /चिक्कु/. ब्राह्मणी बोलीतील स् हा अधिक परंपरानिष्ठ असावा असे म्हणता येईल, कारण आदिद्रविडमधील /च्/ या स्वनिमामध्ये सीत्कार स्वनांतरांचा समावेश होत असावा (आधुनिक तमिळच्या बऱ्याचशा बोलीमध्ये तो तसा आहे.) जेथे ब्राह्मणेतर बोली अधिक नवनिर्मिती दाखवितात अशा पाच इतर स्वनिमसंगती नोंदविल्या गेल्या आहेत. परंतु या उलट परिस्थितीही आढळू शकते. उदाहरणार्थ, ब्राह्मणी बोलीतील /एऽ/ तर ब्राह्मणेतर बोलींतील /या/ या दोहोंपैकी /या/ हा आदिद्रविडमधील असावा असे दिसते. 'मी' या अर्थाने ब्राह्मणी बोलीत /एऽमु/ तर ब्राह्मणेतर बोलीत /यामु/ अशी रूपे आहेत. तुलनेसाठी तमिळमध्ये/याण्/. यावरून असे दिसते की ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर या दोन्ही बोलींनी स्वनिमव्यवस्थेमध्ये नवनिर्मिती केलेली आहे; त्यातही ब्राह्मणेतर बोलीमध्ये ती अधिक आहे. महाप्राण या परकीय घटकाचा समावेश ही विशिष्ट प्रकारची नवनिर्मिती मात्र ब्राह्मणी बोलीनेच

केली आहे.

ऐतिहासिक दृष्टीने पाहता तुळूच्या ब्राह्मणी आणि ब्राह्मणेतर बोलींमधील पदिमव्यवस्थांची परस्परसंगती दाखविणे कठीण आहे, कारण शब्दांची जुनी रूपे दाखविण्यासाठी लेखनपद्धतीच उपलब्ध नाही. आणि आदिद्रविडच्या पदिमव्यवस्थेची संपूर्ण मांडणीसुद्धा अजूनपर्यंत करण्यात आलेली नाही. परंतु संशोधन करताना काही विशिष्ट पैलूंच्या बाबतीत परस्परसंगती निश्चित करता येते. उदाहरणार्थ, मानवाचा निर्देश करणाऱ्या 'रॅशनल' नामांचा षष्ठीचा प्रत्यय ब्राह्मणी बोलीत /-नो/ तर ब्राह्मणेतर बोलीत /-दा/ असा आहे. म्हणून 'मुलाचा' या अर्थाने ब्राह्मणी बोलीत/आमु-ना/ आणि ब्राह्मणेतर बोलीत /आमु-दा/ अशी रूपे होतात. तुलनेसाठी तमिळमधील /अळ-इन/ हे समकुलीन रूप. मानवेतर 'इरॅशनल' नामांसाठी तुळूमध्ये ब्राह्मणी बोलीत /-न्ते/ आणि ब्राह्मणेतर बोलीत /-दा/ असे प्रत्यय आहेत. यावरून ब्राह्मणेतरांनी सर्व प्रकारच्या नामांसाठी सर्वसामान्य प्रत्यय म्हणून ब्राह्मणेतर बोलीत /-दा/ हा दंत्य प्रत्यय स्वीकारलेला दिसतो. याउलट, वर्तमान कालवाचक धातुसाधितांसाठी प्रत्यय ब्राह्मणी बोलीत /-इ/ आणि ब्राह्मणेतर बोलीत /-आ/ यांच्यात परस्परसंगती असलेली दिसते. उदाहरणार्थ 'येत आहे' या अर्थाने ब्राह्मणी बोलीत /बारपि/ आणि ब्राह्मणेतर बोलीत /बारपा/ यांपैकी ब्राह्मणेतर बोलीतील रूपाचे इतर द्रविड भाषांतील रूपांशी साम्य आहे. उदाहरणार्थ, तमिळमध्ये /वारु-किण्र्-आ/ आणि कन्नडमध्ये /बार-उव्-आ/ या शब्दांचा 'येत आहे' असा अर्थ होतो.

स्वनिमव्यवस्थांप्रमाणे पदिमव्यवस्थांचीही तुलना केली असता ब्राह्मणी आणि ब्राह्मणेतर या दोन्ही बोलींनी नवनिर्मिती केल्याचे दिसते. थोडक्यात म्हणजे, तुळू भाषेतील पुरावे असे दाखवितात की अर्थबदल, शब्द आणि स्वनिम या स्तरांवर उसनवारी इत्यादी प्रकारचे बदल जाणीवपूर्वक करण्यात ब्राह्मणी बोली अग्रेसर आहे. उलट देश्य सामग्रीमध्ये स्वनिम आणि पदिम या स्तरांवर काहीशा नकळत होत जाणाऱ्या बदलांच्या प्रक्रिया ब्राह्मणी आणि ब्राह्मणेतर अशा दोन्ही बोलींमध्ये होताना आढळतात.

**निष्कर्ष**

आजवर अभ्यासलेल्या पुराव्यांवरून आम्हाला असे वाटते की उच्च वर्णीयांच्या आणि निम्न वर्णीयांच्या बोली या एकमेकींपासून स्वतंत्रपणे — आणि येथे म्हटल्याप्रमाणे जाणीवपूर्वक व अजाणता — नवनिर्मिती करीत असतात. या बदलांपैकी जाणीवपूर्वक बदलांवर नेहमीच उच्च वर्णीयांच्या बोलीची छाप असते. तुळू भाषेच्या

बाबतीत पाहिल्याप्रमाणे, काहीशा अजाणता होणाऱ्या बदलांचा परिणाम उच्च आणि निम्न अशा दोन्ही स्तरांवरील बोलींमध्ये होत असावा असे दिसते. परंतु तमिळ आणि कन्नड भाषक ब्राह्मणांमध्ये शिक्षणाचा सर्वदूर प्रसार झाला आहे, तेथे लेखनाच्या औपचारिक शैलीमुळे अजाणता होणाऱ्या बदलांच्या प्रक्रियेला काहीसा प्रतिबंध झाला आहे, असे दिसते. तुळूप्रमाणेच कोडुगु भाषेमध्ये लेखनाची परंपरा नाही, म्हणून तेथे अशा प्रकारचा अभ्यास करण्यात आला तर आपल्या निष्कर्षांची अधिक कसोशीने पडताळणी करून पाहण्यासाठी ते फार महत्त्वाचे ठरेल.

भाषेच्या इतिहासात सामाजिक घटकांचे महत्त्व होनिग्जवाल्ट् (१९६०) आणि शोग्ट् (१९६१) या संशोधकांनी यापूर्वीच दाखवून दिले आहे. दक्षिण आशियाच्या संदर्भात सामाजिक बोलींचा अधिक अभ्यास करण्यात आला तर भाषाबदलाची प्रक्रिया समजून घेण्यास त्याचा मोठाच हातभार लागेल, असे आम्हाला वाटते.

## चर्चा[२]

**हाउगन्**

'अनौपचारिक' (इन्फॉर्मल) किंवा 'नेहमीच्या बोलण्यातील' (कलोकिअल्) शैली या संज्ञांऐवजी 'अवधानपूर्वक न केलेले' (कॅज्युअल) आणि 'अनौपचारिक' (फॉर्मल)ऐवजी 'अवधानपूर्वक केलेले' (नॉन-कॅज्युअल) असे शब्दप्रयोग वोगलिन यांनी वापरले आहेत. माझ्या अलीकडील अभ्यासावरून मला असे सुचवावेसे वाटते की या प्रश्नाकडे सामाजिक दृष्टिकोणातून पाहता बोलण्याची 'वैयक्तिक'(प्रायव्हेट) शैली ही संज्ञा अधिक योग्य आहे. याउलट एखाद्या समूहाशी बोलताना वापरायच्या शैलीला 'सामूहिक'(पब्लिक) शैली म्हणता येईल. एका सलग विचारपटाची ही दोन टोके ठरतील. शिक्षणामुळे भाषाबदलाला प्रतिबंध होतो, हा निष्कर्ष भाषांच्या पारंपरिक इतिहासाला परिचित आहे. परंतु त्याची योग्य प्रकारे पडताळणी झालेली नाही आणि त्यासंबंधी अधिक पुरावे आपल्याला हवेच आहेत. 'करंट अँथ्रपॉलजी' या नियतकालिकामध्ये बर्गझ्लँड् आणि फोग्ट् या संशोधकांनी प्रसिद्ध केलेल्या 'ग्लॉटोक्रोनॉलजि'[३] या विषयावरील शोधनिबंधात असे दाखवून दिले आहे की आइसलँडिक भाषिक समाज हा बदलाच्या आत्यंतिक विरोधी आहे; हा समाज गेली हजार वर्षे बहुतांशी शिक्षितच आहे, हे त्याचे एक कारण असावे. या संदर्भातील भावी संशोधनाचे किंचित सूचन या संशोधनावरून होते. नवनिर्मितींच्या संदर्भात 'जाणीवपूर्वक' आणि 'अजाणता' या शब्दांची व्याख्या काळजीपूर्वक न केल्यास हे शब्द अर्थनिश्चितीच्या दृष्टीने काहीसे अडचणीचे ठरतात. व्याकरणाच्या संदर्भात 'पृष्ठस्तरीय'(सर्फेस) आणि 'अंत:स्तरीय'(डीप) अशा संज्ञा काही संशोधक वापरतात,

त्यांच्याशी कदाचित वरील शब्दांची अशी सांगड घालता येईल की ब्राह्मणी बोलीतील बदल हे उसनवारीतून आल्यामुळे वरवरचे असतात तर ब्राह्मणेतर बोलींतील बदल हे भाषेच्या प्रवाहीपणामुळे झालेले म्हणजे अधिक खोलवरचे असतात.

**फिशर**

भाषाबदलांच्या प्रवर्तकांचे सामाजिक स्थान ठरविण्यासाठी ब्राइट यांनी मांडलेली तुळू भाषेसंबंधी माहिती विशेष महत्त्वाची ठरू शकेल, कारण ब्राह्मणांतील शिक्षणाचा प्रसार आणि ब्राह्मणेतरांतील त्याचा अभाव हा गुंतागुंतीचा मुद्दा येथे दुय्यम आहे, किंबहुना तो येथे मुद्दाच नाही. ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर बोलींच्या सामायिक नवनिर्मितीची काही एक साखळी आहे असा पुरावा हाती आला तर तो लक्षणीय ठरेल.

मात्र येथे सावधगिरीचा एक इशारा द्यायला हवा. माझ्या मते भाषाबदलाची खरी प्रक्रिया ही एकमेकांच्या प्रत्यक्ष संपर्कात असणाऱ्या भाषिक समूहांमध्येच सापडेल. भारताच्या या उपरोक्त भागात ब्राह्मण व ब्राह्मणेतरांच्या सामाजिक संपर्काला व विचारविनिमयाला असणारे अडथळे जर फार प्रबळ असतील, तर एकमेकीच्या भाषासंपर्कात असणाऱ्या प्रत्येक निम्न जातीतील पुढारलेले लोक हेच त्यांना भाषिक आदर्श वाटू लागतील; त्यांच्या लगतच्या उच्च जातीचा आदर्श त्यांच्यापुढे राहणार नाही. मला असे वाटते की भाषाबदलाच्या बाबतीत एखाद्या गोष्टीचे अनुकरण करण्यासाठी असो किंवा तिच्यापासून दूर जाण्यासाठी असो, कोणाचेतरी पुढारीपण आवश्यकच असते. मात्र अशा प्रकारचे पुढारीपण हे औपचारिक मान्यता असणाऱ्या राजकीय, आर्थिक वा धार्मिक नेतृत्वाकडेच जाईल असे नाही. तसे पाहता भारताच्या या भागात जातीतल्या जातीत असणारे नेतृत्व हेच जर बदलाच्या प्रक्रियेत आदर्श म्हणून महत्त्वाचे असेल तर निम्न जातींनी उच्च जातींच्या भाषेचे अनुकरण करणे पूर्णपणे थांबले नाही तरी मंदावेल हे नक्की. संदेशनाच्या प्रक्रियेमध्ये जातीजातीचे जे अडथळे आहेत त्यांचा शोध घेतेवेळी आयुष्याच्या सुरुवातीचा, म्हणजे बालपणापासून वयात येईपर्यंतचा काळ हा सर्वाधिक महत्त्वाचा ठरेल, असा माझा कयास आहे.

**स्योबर्ग :**

तमिळ व कन्नड भाषांसंबंधी जो आकृतिबंध तुम्ही दाखविला आहे तो निश्चितपणे तेलगूलाही लागू पडतो. उच्चशिक्षित तेलगू भाषक हे समाजात प्रसंगानुरूप औपचारिक किंवा अनौपचारिक शैलीचा अवलंब करतात. अलीकडच्या काळात पाश्चात्यांचा अतिप्रभाव ज्यांच्यावर आहे असे काही लोक सोडल्यास हा प्रकार ब्राह्मणांमध्ये फार प्रकर्षाने दिसतो. तुमच्या निबंधातील वर्णनावरून मला असे वाटते की ब्राह्मण-ब्राह्मणेतर बोली आणि औपचारिक-अनौपचारिक अशा दोन स्वतंत्र सरणी तुम्हाला





अनुक्रमणिका

अभिप्रेत आहेत. परंतु तेलगू भाषकांमध्ये ब्राह्मणी बोलीतच औपचारिक व अनौपचारिक अशा किमान दोन शैली अंतर्भूत आहेत. ब्राह्मणेतर बोली बोलणाऱ्यांमध्ये औपचारिक व अनौपचारिक अशा दोन शैली असणारे काही थोडे लोक असतील; परंतु बहुतेकांना अनौपचारिक किंवा संभाषणात्मक ही एकच शैली अवगत असते. तुमच्या मांडणीवरून या दोन सरणींची परस्परव्याप्ती स्पष्ट होत नाही. शिवाय, ब्राह्मणांच्या व मध्यम वर्गीयांच्या अगदी अनौपचारिक बोलण्यापासूनही ज्यांची बोली बरीच भिन्न आहे अशा अशिक्षितांचा समावेश या मांडणीत झालेला नाही.

**टिपा :**

१. भाषांतरकारांची पुरवणी टीप : तमिळ, तुळू, कन्नड यांपैकी कोणत्याच भाषेतील सर्व उच्चार देवनागरी लिपीमध्ये लिहून दाखविता येत नाहीत. तरी ते शक्य तेवढे बिनचूक दाखविण्याचा प्रयत्न येथे केला आहे. मूळ लेखात 'आंतरराष्ट्रीय स्वनलिपी' किंवा 'इंटरनॅशनल फनेटिक आल्फाबेट'च्या (आय.पी.ए.) जुन्या पद्धतीनुसार उच्चार दर्शविलेले आहेत, ते या भाषांतरात वगळले आहेत. मात्र या उच्चारांबाबत मतभेद असण्याचीही शक्यता आहे.

२. हा शोधनिबंध मुळात केंब्रिज, मॅसच्युसेट्स येथे १९६४ साली झालेल्या ९ व्या इंटरनॅशनल काँग्रेस ऑफ लिंग्विस्टस्‌मध्ये सादर केला गेला. त्यानंतर त्यावर झालेल्या चर्चेमध्ये हाउगन, फिशर आणि स्योबर्ग या भाषावैज्ञानिकांनी प्रामुख्याने भाग घेतला होता. त्यांच्या मतांचा गोषवारा येथे दिलेला आहे.

३. परस्परसंबंधित परंतु स्वतंत्र भाषांमधील मूलभूत शब्दनिधीचे सांख्यिकी विश्लेषण करून त्या भाषा एकमेकींपासून केव्हा विलग झाल्या असतील याचा शोध ग्लॉटोक्रोनॉलजि या ज्ञानशाखेत घेतला जातो.

**संदर्भ सूची :**

Bloch, J. (1910) Castes et dialecltes en Tamoule, Memoires de la Societe de Linguistique, vol. 16, pp. 1-30.

Brigel, J. (1872) A Grammar of the Tulu Language, Bangalore.

Bright, W. (1960a), Linguistic change in some South Indian caste dialects' in C.A. Ferguson and J.J. Gumperz (eds.) (1960), pp 19-26

Bright, W. (1960b) 'Social dialect and language history' *Curr. Anthrop*, vol. 1, pp. 424-5.

Bright, W. and A. K. Ramanujan (1962) A Study of Tamil Dialects, Committee on South Asian Studies, University of Chicago, mimeograph.

Burrow, T. and M. B. Emeneau (1961) A Dravidian Eymological Dictionary, Oxford University Press.

Ferguson, C. A. (1959) 'Diglossia' Word, vol. 15, pp 325-40.

Ferguson, C. A, and J. J. Gumperz (1960) Linguistic Diversity in South Asia, Indiana University Research Center in Anuthropology, Folklore and Linguistics, Publication No. 13.

Fischer, J. L. (1958) 'Social Influences in the Choice of a Linguistic Variant', Word, vol. 14, pp. 47-56.

Haas, M. R. (1944) 'Men's and Women's Speech in Koasati', Language, vol. 20, pp. 142-9.

Hoenigswald, H. (1960) *Language Change and Linguistic Reconstruction*. University of Chicago Press.

Joos, M. (1952) 'The medieval sybilints', *Language*, vol. 28, pp.222-31.

Jothimutthu, P. (1956) *A Guide to Tamil by the Direct Method.* Madras.

Krishnamurti, B. (1958) 'Proto-Dravidian *Z', *Indian Linguistics*, vol. 19, pp. 259-93.

Matthews, G. (1942) 'The vulgar pronunciation of Tamil', *Bull Sch. Oriental Stud*, vol. 10, pp. 992-7.

Opler, M. and H. Hoijer (1940) 'The raid and war-path Language of the Chiricahua Apache', AmA, vol. 42, pp. 617-34.

Ramaswamy Aiyar, L.V. (1932a) ' Tulu prose texts in two dialects', *Bull Sch. Oriental Stud.* vol. 6, pp. 897-931.

Ramaswamy Aiyar, L.V. (1932b) 'Tulu Initial Affricates and Sibilants', *Q.J.Mythic Soc.* Bangalore, vol. 22, pp. 259-73.

Ramaswamy Aiyar, L. V. (1936) 'Materials for a Sketch of Tulu Phonology', *Indian Linguistics*, vol. 6, pp. 385-439.

Sapir, E. (1915) 'Abnormal types of speech in Nootka', *Geological Survey of Canada, Memoir 62, Anthropological Series*, No. 5, Ottawa.

Schogt, H.G. (1961) 'La notion de loi dans la phonetique historique', *Lingua*, vol. 10. pp. 79-92.

Shanmugam Pillai, M (1960) 'Tamil-literary and Colloquil', In Ferguson and Gumperz (1960), pp. 27-42.

Vinson, J. (1895) 'Les variations phonetiques de la prononciation populaire Tamoule'. Centenaire de l' Ecole des Llangues Orientales Vivantes, pp. 115-26, Paris.

Zengel, M.S. (1962) 'Literacy as a factor in language change', *AmA*, vol. 64, pp 132-9.

Zvelebil, K. (1959) 'Dialects of Tamil, 1-2', _Archiv Orientalni,_ vol. 27, pp. 272- 317, 572-603.

Zvelebil, K. (1961) 'Dialects of Tamil, 3', _Archiv Orientalni,_ vol. 28, pp. 414-56.

Zvelebil, K. (1961) 'Some features of Dindigul Tamil', _Te. P. Mi. Manivira Malar_ (T. P. Meenakshisundaram Commemoration Volume). pp. 424-6, Coimatore. ■



<u>**लेखक-परिचय**</u>

**डॉ. विल्यम ब्राइट** (जन्म : १९२८) : १९५५ मध्ये भाषाविज्ञानात पीएच्.डी. युनिव्हर्सिटी ऑफ कॅलिफोर्निया ॲट लॉसएंजल्स येथे १९५९ पासून भाषाविज्ञान, हिंदी व मानववंशविज्ञान या विषयांचे अध्यापन. सध्या तेथेच सुप्रतिष्ठित प्राध्यापक (प्रोफेसर एमेरिट्स), १९५५-५६ मध्ये रॉकफेलर फौंडेशनची फेलोशिप - त्या वेळी डेक्कन कॉलेज, पुणे येथे भाषाविज्ञानाचे अध्यापन व बंगलोर येथे कन्नड भाषेबद्दल संशोधन. १९६७ मध्ये फोर्ड फौंडेशनची फेलोशिप. त्या वेळी हैदराबाद (केंद्रीय इंग्रजी संस्था) व दिल्ली (दिल्ली विद्यापीठ) येथे अध्यापन. लिंग्विस्टिक सोसायटी ऑफ अमेरिकेच्या ''लॅग्विज'' या नियतकालिकाचे संपादक. 'इंटरनॅशनल एन्सायक्लोपेडिया ऑफ लिंग्विस्टिक्स'चे प्रमुख संपादक.

**डॉ. ए.के. रामानुजन** (१९२९-९३) : कवि, भाषांतरकार, भाषाविज्ञानी. तमिळ, कन्नड व इंग्रजीचे उत्तम ज्ञान. डॉ. यु. आर. अनंतमूर्तींच्या 'संस्कार' या कन्नड कादंबरीचे इंग्रजी भाषांतर (१९७६). इंडियाना विद्यापीठातून भाषाविज्ञानात पीएच्.डी. (१९६३). भारत सरकारने 'पद्मश्री' पुरस्कार देऊन गौरव केला (१९८३). शिकागो व अन्य काही विद्यापीठांत भाषाविज्ञानाचे अध्यापन.

सध्याच्या मराठीबद्दलच्या एकदोन गमती प्रथम पाहूया. सातवीत शिकणाऱ्या एका मुलीला तिच्या टीचरने 'फजिती होणे' याचा शब्दार्थ 'पोपट होणे' असा चक्क फळ्यावर लिहून दिला. घरी आई वही पाहताना म्हणाली, 'हे काय ?' 'आई, अपसेट होऊ नको ना ! हे बाईंनीच सांगितलेय. गॉड प्रॉमिस.' आई पुन्हा उडालीच. गॉड प्रॉमिस म्हणजे देवाशपथ हे तिला कळलं पण वळलं नाही. शाळा चांगली म्हणजे महाग आहे.

मग मी या प्रसंगावरच्या अनेकांच्या प्रतिक्रिया जाणून घेतल्या. माझ्या लक्षात आलं की चाळीस किंवा त्याहून जास्त वयाचे स्त्रीपुरुषच मराठीची 'भयंकर' चिंता करत आहेत. खरोखर मराठीचं भवितव्य ज्यांच्यामुळे ठरणार आहे ती तरुण पिढी निवांत आहे.

**आशा मुंडले**, 'माहेर', ऑक्टोबर २००४





अनुक्रमणिका

# कोशवाङ्मय आणि ज्ञानभाषा मराठी

अरविंद टिकेकर

[महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिकाच्या वितरणप्रसंगी केलेले भाषण १९.१२.२००४]

विविध वाङ्मयप्रकारांत कोशवाङ्मय हा लक्षणीय प्रकार आहे. संख्येने कमी पण गुणवत्ता-उपयुक्ततेने अधिक म्हणून त्याचे कुठल्याही भाषेतील साहित्यात अबाधित महत्त्व आहे. मराठी भाषेत अनेक तऱ्हेचे कोश प्रसिद्ध झाले आहेत, होत आहेत. कोशकार विद्वान, मातब्बर व्यक्ती आहेत. एखादा विषय 'जीवनविषय' मानून लेखन करणाऱ्यांनी त्या विषयाचा कोश निर्माण केल्याचीही उदाहरणे आहेत. प्रारंभी 'मंडळी, मर्यादित' स्थापून प्रसिद्ध होणारे कोश पुढे शासकीय उपक्रम झाले. पूर्वी राजे-रजवाडे त्यांच्या अर्थसाह्याने सिद्ध होणारे कोश आता शासकीय अनुदानाने तयार होऊ लागले. काही धाडसी प्रकाशकही कोशनिर्मितीकार्यात पुढे सरसावले. कोशवाङ्मयास सर्व स्तरांवर महत्त्वाचा ग्रंथप्रकार म्हणून मान्यता मिळत असल्याचे हे द्योतक आहे.

कोश इतर ग्रंथांहून लेखन, मांडणी, निर्मिती, उपयोग इ० सर्व बाबींत वेगळे असतात. कोश हा माहितीचा साठा असतो व त्यातील हवी ती माहिती लागलीच मिळेल अशी; अकारविल्हेवारीने, वर्गवारीने तिची मांडणी असते. माहितीची विभागणी करून अनेक खंडांतून देण्याची पद्धती असते. कोशेतर ग्रंथ सामान्यतः सलग वाचण्यासाठी असतात. 'एकदा उघडल्यावर संपेतोपर्यंत बंद न करणे' हा त्यांचा गुण असतो. कोशांचे तसे नसते. कोश उघडला की हवी ती माहिती चटकन मिळवून बाजूला ठेवावा, अशी तेथे अपेक्षा असते. ग्रंथप्रकारांत कोश वेगळा म्हटले तरी त्याचे इतर ग्रंथप्रकारांशी निकटचे नाते असते. मराठी भाषेतील शब्दकोश, ज्ञानकोश, चरित्रकोश त्या विषयांतील इतर ग्रंथप्रकारांच्या परिशीलनांतूनच निर्माण होत असतात. वाङ्मयकोशात साऱ्या वाङ्मयप्रकारांचे अस्तित्व प्रतिबिंबित होते. कोशांतील लेखन व्यापक, विस्तृत, प्रसंगी सखोल असते, असावे लागते. ज्या भाषेतून ते होते ती भाषाही त्यामुळे संपन्न, समृद्ध होत जाते. कोशवाङ्मयाच्या प्रवेशद्वारातून त्या विषयाच्या विशालतेपर्यंत जाता येते. कोश अभ्यासक-संशोधकांना इतर ग्रंथप्रकारांकडे वळवतात व इतर ग्रंथप्रकारांच्या मंथनातून कोशरूपी नवनीत तयार होते. अशा घनिष्ट परस्परसंबंधांमुळेच कोशवाङ्मयाचे महत्त्व टिकून आहे.

कोशाचे मुख्य उद्दिष्ट ज्ञानोपासना, ज्ञानसंवर्धन मानले जाते. मात्र सर्वच लेखन ज्ञानाच्या पदवीस पात्र होत नाही. डी.जे.फॉस्केट ह्या ब्रिटिश लेखकाने आपल्या 'पाथवेज फॉर कम्युनिकेशन' ह्या छोटेखानी पुस्तकात माहिती-ज्ञानाचे चार वर्ग कल्पिले आहेत : १. फुटकळ माहिती (डेटा) २. सुसंघटित माहिती (इन्फर्मेशन) ३. ज्ञान (नॉलेज) ४. सर्वमान्य ज्ञान (विझ्डम). नभोवाणी-चित्रवाणीवरील त्रोटक, एकमेकींशी संबंध नसलेल्या बातम्यांना त्याने फुटकळ माहिती म्हटले. काही आशय-विषयाची संगती ठेवून केलेल्या लेखनास सुसंघटित माहितीचा वर्ग दिला. व्यापक, विस्तृत, सखोल माहिती विषयास साजेशा भाषेत मांडल्यास ज्ञानाच्या पायरीपर्यंत पोचते. स्थल-कालाच्या चाळणीतून राहिलेले ज्ञान सर्वमान्य ज्ञान म्हणून अत्युच्च दर्जाचे ठरते. कोश म्हणून काढलेल्या ग्रंथांना लहान-मोठेपणा त्यातील माहितीच्या सुसंघटितपणामुळे या वर्गामुळे मिळतो.

माहिती-ज्ञान साधनांची अजून एक वर्गवारी केली जाते. प्रायमरी, सेकंडरी आणि टर्शरी. मूळ, अस्सल माहिती प्रथम दर्जाची, 'प्रायमरी', तर अन्य ग्रंथ-माहिती-साधनांतून सिद्ध झालेली, दुय्यम (सेकंडरी). अन्य ग्रंथ व दुय्यम माहिती साधनांतून तयार होते ती तिसऱ्या स्तराची (टर्शरी). कोशातील माहितीसाठा मूळ लिहिला की दुसऱ्या ग्रंथ-साधनांतून घेतला त्यावरून त्याची गुणवत्ता ठरते. बरेचशे कोशकर्ते आपले नाव 'संग्राहक', 'संकलक', 'संपादक' असे त्यामुळेच लिहितात व आपल्या कोशांचा वर्ग दुय्यम ठरवितात. औरंगाबादच्या मा.च. जैन ग्रंथमाला ट्रस्टने १९७२ ते १९८४ दरम्यान चार खंडांत प्रसिद्ध केलेल्या जैन ज्ञानकोशावर प्रांजळपणे संग्राहक 'अज्ञात' असे लिहिले आहे. कोशकारांच्या (एक वा अनेक) नावाने ओळखले जाणाऱ्या कोशांची प्रत इतरांपेक्षा त्यामुळे वरची असते.

कोशांचे प्रकार विस्मित करणारे आहेत. शब्दकोश, ज्ञानकोश, स्थलकोश, चरित्रकोश हे सर्वपरिचित प्रकार आहेत. त्यांचे उपप्रकारही अनेक आहेत. शब्दकोशात व्याख्या, म्हणी, परिभाषाकोश, तसेच दोन भाषांतील, दोहोंहून अधिक भाषांतील, सचित्र, एकखंडीय, बहुखंडीय... असे उपप्रकार संभवतात. एखाद्या विषय-ज्ञानशाखेतील शब्दकोशही निर्माण होतात. १८०५-१८६७ ह्या कालावधीत छापलेली मराठी दोलामुद्रिते न्याहाळता 'डिक्शनरी/कोश' हा शब्द वापरून प्रसिद्ध झालेले १५ शब्दकोश आढळतात. त्यांतील १८६३मध्ये निघालेल्या 'हंसकोशा'चे उदाहरण त्याच्या कर्त्याच्या कल्पकतेचे म्हणून देता येईल. 'महाराष्ट्र भाषेच्या कवितांमधील कठीण व निवडक शब्दांचा हा कोश आहे. संतकवी हंसराजस्वामी ह्यांच्या आदरापोटी हे नाव दिले. 'फर्डुक वही' ह्या नावाने छापलेला लोकप्रचारातील म्हणींचा संग्रह आहे.

शब्दरत्नाकर 'मराठी शब्दार्थ चंद्रिका', 'मराठी भाषेचा वज्रकोश', 'शुद्ध मराठी कोश'... अशा नावांनी शब्दकोशसदृश ग्रंथ काढण्याची परंपरा आजपर्यंत चालू आहे. ज्ञानकोश व चरित्रकोशातही सर्वसमावेशक, एका विषयोपविषयाशी सीमित असे कोश निघत राहिले. कोशनिर्मितीसाठी आवश्यक ती उपक्रमशीलता व कल्पनाशक्ती अद्यापही शाबूत आहे ही समाधानाची गोष्ट आहे.

मराठी भाषेतील कोशवाङ्मयाचा आढावा मराठीतील सूचींचा निर्देश केल्याशिवाय पुरा होणार नाही. मराठी साहित्य संपदेचे समग्र ज्ञान करून देणाऱ्या त्या सूची आहेत. १८०० ते १९५० ह्या दीडशे वर्षांत प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांची विषयवार सूची, तसेच नियतकालिके व त्यातील लेखांच्या विषयवार सूची तयार करण्याचे विक्रमी कार्य शंकर गणेश दाते यांनी केले. त्या अर्थाने कोशवाङ्मयातील सूचीचे दालन त्यांनी समृद्ध केले आहे. दाते ग्रंथसूचीच्या आराखड्याप्रमाणे १९५१-१९६२ ह्या कालावधीतील ग्रंथांची पुरवणीसूची श्री. शरद साठे ह्यांनी तयार केली व महाराष्ट्र राज्य मराठी विकास संस्थेने ती प्रसिद्ध केली. पुढील कालखंडातील ग्रंथसूचीची तयारी चालू आहे. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय आणि दाते सूचिमंडळाच्या विद्यमाने नियतकालिके व त्यातील लेखसूची संकलनाचे कार्य श्री. व. भि. बेलसरे मोठ्या चिकाटीने करीत आहेत. म्हैसूर येथील केंद्रीय भारतीय भाषा संस्थान, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, महाराष्ट्र फाऊंडेशन, नारळकर फाऊंडेशन ह्या संस्थांचे आर्थिक साह्य ह्या प्रकल्पास लाभत आहे. कालिक लेखसूचीचे १९५१-८० ह्या वर्षातील खंड प्रसिद्ध होत आहेत. मराठी कोश अद्ययावत ठेवण्यासाठी यंत्रणा नाही, असे म्हणणाऱ्यांपुढे दाते सूचिमंडळाचे हे अनुकरणीय कार्य उदाहरण म्हणून ठेवता येईल. शं.ग. दाते ह्यांच्या सूचिकार्यापासून स्फूर्ती घेऊन व्यक्तिगत लेखकांच्या, वृत्तपत्रे-कालिकांच्या व सूचींच्या सूचीही प्रसिद्ध झाल्या. अनुवादित ग्रंथांची सूची, स्त्री वाङ्मयाची सूची, प्रादेशिक सूची, दलित वाङमयसूची इ० प्रकल्प चालू आहेत. काही पुरे झाले आहेत. जुन्या व मोठा ग्रंथसंग्रह बाळगणाऱ्या ग्रंथालयांच्या 'नामवह्या' प्रसिद्ध करण्याची परंपरा आता खंडित झाली आहे. भारतीय राष्ट्रीय ग्रंथसूचीतील मराठी विभागाचे वार्षिक खंडही आता निघत नाहीत.

मराठी माणसांची सर्जनशीलता व काही नवीन करून दाखविण्याची जिद्द नवनवीन कोशांना जन्म देत असते. संकेतकोश, भारतीय व्यवहार कोश, देवीकोश, गणेशकोश, भक्तिकोश, श्रीरामकोश, पक्षीकोश, शोध विज्ञान कोश, क्रीडा ज्ञानकोश, यंत्रालयाचा ज्ञानकोश, कृषिविज्ञान कोश, मराठी नाट्यकोश, यांनी घडवलं सहस्त्रक, मराठी सारस्वत, प्रकाशनविश्व इ० अनेक प्रकाशनांचा उल्लेख ह्यांत करता येईल. इंग्रजी

भाषेतील काही कोश ह्या वर्गात मोडण्यासारखे आहेत. १९७७ साली परगॅमॉन प्रेसने 'दि एन्सायक्लोपिडिया ऑफ इग्नरन्स : एव्हरिथिंग यू एव्हर वाण्टेड ट्ट नो अबाउट दि अननोन' हे पुस्तक छापले. मुखपृष्ठावर 'कम्पेअर्ड टु द पौंड ऑफ नॉलेज, अवर इग्नरन्स रिमेन्स ॲटलांटिक' असा शेरा देऊन. दुसरे उदाहरण पियर्स सायक्लो-पिडियाचे. पीअर्स साबणाचे उत्पादन करणाऱ्या कंपनीने हा एकखंडीय लघु ज्ञानकोश जोडउत्पादन म्हणून काढला. आमचा साबण तुमचे शरीर स्वच्छ ठेवेल व आमचा ज्ञानकोश तुमचे अंतरंग, असेच जणू काय त्यांनी ठरविले होते. 'ए बुक ऑफ रेफरन्स अँड बॅकग्राउंड इन्फरमेशन फॉर ऑल द फॅमिली' असे त्याचे वर्णन केले आहे. गेली ११० वर्षे नित्याने हा कुटुंबकोश प्रसिद्ध होतो आहे. कुटुंबाला व पर्यायाने समाजाला ज्ञानोपासक बनविण्याचा त्याने चंग बांधला आहे. कोशनिर्मितीचे हे लहान प्रयत्न कोशवाङ्मयाची व्याप्ती वाढवत असतात, म्हणून त्यांचे स्वागत केले पाहिजे.

कोशवाङ्मयाच्या महतीची, उपयुक्ततेची जाण होण्यासाठी मोठ्या ग्रंथालयाचा ग्रंथपालच व्हावयास हवे ! मोठ्या ग्रंथालयात विविध कोशांनी युक्त असा संदर्भविभाग तयार केला जातो. ह्या संग्रहात नित्य नवी भर पडत असते. सामान्य नागरिकांपासून अभ्यासक-संशोधकांच्या काही ना काही पृच्छा असतात व संदर्भग्रंथांच्या साह्याने त्यांचे सत्वर निरसन करत गेल्यास ग्रंथालयातील इतर ग्रंथांना वाचक लाभतात. संदर्भसेवा ही व्यक्तिगत सेवा असते. ह्या सेवेचे दोन प्रकार असतात. एक, सत्वर सेवा. एखाद्या शब्दाचा अर्थ, एखाद्या संस्थेचा पत्ता, एखाद्या व्यक्तीची माहिती... त्या त्या कोशांतून चटकन काढून देता येते. दुसरी सेवा व्यापक स्वरूपाची असते. काही निवडक देशांतील साक्षरता, अत्यंसंस्कार पद्धतीसारखी माहिती काही ग्रंथ, संदर्भग्रंथ पाहून द्यावी लागते. संदर्भग्रंथांतील एक संदर्भ संबंधिताला अनेक ग्रंथाकडे घेऊन जातो. संदर्भग्रंथांतील माहिती अधिकृत, विश्वसनीय हवी. संदर्भग्रंथातील मजकुराची मांडणी सत्वर शोधास अनुकूल हवी. त्यामुळेच असे कोश संशोधकांचे मित्र व जिज्ञासूंचे सोबती बनतात. ग्रंथालयाच्या संदर्भ-विभागात अनेक संदर्भग्रंथ ठेवले पाहिजेत. त्यात विविधता हवी. म्हणजे पृच्छक माहितीविना विन्मुख जाणार नाही. येथे संदर्भ-ग्रंथपालाचे कार्य अधोरेखित केले पाहिजे. ग्रंथांना वाचक मिळविण्यात, टिकविण्यात त्याची कसोटीच लागते. संदर्भग्रंथांचे स्वरूप असलेले कोशवाङ्मय ग्रंथालयात कसे जाईल, त्याच्या वापराचे ज्ञान संबंधितांना कसे मिळेल ह्याकडे लक्ष दिले पाहिजे. आपणाकडे घरात काही उपयुक्त संदर्भग्रंथ ठेवण्याची प्रथा दृढ झाली नसल्याने आपला ह्या बाबतीतला रोख ग्रंथालयाकडे वळला पाहिजे.

मराठी कोशवाङ्मयाची भलावण करताना काही दोषांचा, उणिवांचा निर्देश करणे

चुकीचे ठरणार नाही. कोशनिर्मितीमागील पूर्वतयारी, खटाटोप लक्षात घेता तो एकदाच कसाबसा निघतो. त्यातील मजकूर कालबाह्य होण्यास वेळ लागत नाही. वय झालेल्या ह्या कोशांची उपयुक्तता व वापर कमी होत जातो. 'ब्रिटानिका'सारख्या विख्यात कोशांच्या नव्या आवृत्त्या कालांतराने नव्या रूपांत, ढंगात निघतातच. पण 'बुक ऑफ दि यिअर' म्हणून नव्या माहितीचे वर्षपुस्तकही काढण्यात येते. आपणाकडे तसे होत नाही ! सबळ यंत्रणा व अर्थसाहाय्याच्या अभावामुळे काही बहुखंडीय कोशांचे प्रकाशन इतके रेंगाळते, की त्यांचे प्रकाशन होईतोच ते मजुकरात शिळे होतात. जुन्या कोशांचे स्वामित्वहक्क संपताच भली मोठी किंमत ठेवून त्यांची पुनर्मुद्रणे काढणाऱ्यांनी त्यातील मजकुरात भर घालण्याची जबाबदारी 'कर्तव्य' म्हणून स्वीकारावी.

मराठी कोशवाङ्मयाचे दालन समृद्ध आहे असे अभिमानाने म्हटले तरी ती आत्मवंचना होऊ नये ह्याची खबरदारी घेतली पाहिजे. काही बोटांवर मोजण्याइतके कोश कोशशास्त्रीय जाण ठेवून काढले जातात. इतरांत केवळ 'कोश' हा शब्द असतो. शीघ्र शोध घेणारी रचना हा कोशाचा प्राण आहे. त्याच्याशिवाय ते कोशाचे कलेवर होते, ह्याचे लेखक-प्रकाशकांनी भान ठेवले पाहिजे.

कोशांचा आवाका-व्याप्ती, रचना-विशेष, अधिकृत माहिती जमा करण्याची जरुरी इ.मुळे त्यांच्या किंमती सर्वसाधारण ग्रंथांच्या मानाने खूप असतात. परिणामी त्यांच्या विक्रीसाठी वेगळे तंत्र अवलंबावे लागते. ग्रंथप्रदर्शनात खपणारे हे ग्रंथ नाहीत. इंग्रजी कोश खपविण्याचे अनेक मार्ग हाताळण्यात येतात. त्यातील एक हप्त्याहप्त्याने पैसे घेणे. ग्रंथालये, कार्यालये ह्यांजकडे कोश कसे जातील ह्याची चिंता वाहिली पाहिजे. कोशांची मोठी किंमत राज्य व मध्यवर्ती शासनाच्या 'घाऊक खरेदी योजनेतून' त्यांना बाद करते ! कोणी जाणत्या व्यक्ति-संस्थेने त्यांना अटी-शर्तीत बदल करण्यास सुचविले पाहिजे. मोठी किंमत - मोठी सूट हे घातक दुष्टचक्र कुठेतरी थांबविले पाहिजे.

कोशवाङ्मयाचे महत्त्व लक्षात घेता प्रत्येक लहानमोठ्या विषयाचे कोश निघण्यास प्रोत्साहन दिले पाहिजे. कित्येक विषयांत अजून कोश निघालेले नाहीत. अद्याप 'ग्रंथकोश' निघावयाचा आहे ! काही महत्त्वाचे कोशप्रकार मराठीत अजून अवतीर्ण व्हावयाचे आहेत. इंग्रजीत सुस्थापित झालेले 'बुक्स इन प्रिंट' मराठीत — मराठी ग्रंथांची उपलब्धतता विहित पद्धतीत देणारा सूचीकोश — अद्याप निघावयाचा आहे. 'मराठी ग्रंथरत्नाकर' नावाने तो काढता येईल. सामाजिक शास्त्रे, विज्ञान, ललितकला, उपयुक्त कला ह्यातील अनेक विषयांवर अद्याप कोश तयार व्हावयाचे आहेत. नियतकालिकांतील लेखांची सूची आहे. पण संयुक्त पुस्तकांतील - स्मृती गौरव ग्रंथ, लेखसंग्रह - लेखांच्या सूचीचे काम हाती घ्यावयाचे आहे. वार्षिक, हस्तपुस्तके,

निर्देशिका ह्या कोशप्रकारांत आपण मागे आहोत. कोशनिर्मितीतील कागद, छपाई, बांधणी ह्यांबाबत आपणास अधिक लक्ष दिले पाहिजे. कोश ग्रंथालयात सुस्थितीत राहावेत म्हणून आम्लविरहित कागदावर छपाई व अधिक टिकाऊ बांधणीच्या ग्रंथालय आवृत्त्या काढण्याकडे इंग्लंड-अमेरिकेत कल आढळतो.

इंग्रजी कोशांच्या गलबल्यांत मराठी कोशांचे स्थान काय असा प्रश्न उपस्थित होतो. विशेषतः मराठी कोशांचा वापर अधिक कसा होईल ह्याची चिंता व्यक्त होते. भारतीय-महाराष्ट्रीयच नव्हे तर जागतिक स्तरावरील माहिती स्वभाषेत मिळाल्यास हवीच असते. कोश-वाङ्मय प्रकाराची त्यासाठी जाण वाढविली पाहिजे. इंग्रजी कोशांतून का होईना अशी माहिती मिळविण्याची सवय शाळा-कॉलेजांतील विद्यार्थ्यांना लावली पाहिजे. इंग्रजी ज्ञानकोशांत भारतीय विषयांवर माहिती असते. ती कित्येकदा भारतीय तज्ज्ञांकडूनच लिहून घेण्यात येते. कोशजगताची ओळख वाढत गेली की योग्य माहिती मिळविण्यासाठी मराठी कोशांचा आश्रय जरूर घेतला जाईल. ह्याबाबतीत आपलाच न्यूनगंड नडतो. इंग्रजीतील माहिती मराठीत आणण्यात आपण धन्यता मानतो, पण मराठीतील इंग्रजीत नाही ! साध्या ग्रंथपरीक्षणाचे घ्या. मराठी वृत्तपत्रात इंग्रजी ग्रंथांची मराठी परीक्षणे येतात. इंग्रजी वृत्तपत्रांत मराठी ग्रंथांची येत नाहीत ! कोशवाङ्मयाचा वापर करताना भाषेच्या माध्यमाचा जसा बाऊ करू नये, तसाच मुद्रित-अंकीय स्वरूपातील माध्यमाचाही करू नये. कोशवाङ्मयाच्या संदर्भमूल्यामुळे साध्या ग्रंथापेक्षा कोश — शब्दकोश, ज्ञानकोश, ग्रंथसूची — प्रथम अंकीय स्वरूपात उपलब्ध झाले. इंटरनेटवर उपलब्ध असलेल्या डिजिटल डिक्शनरीज ऑफ साऊथ एशिया ह्या यादीत बंगाली, हिंदी, काश्मिरी, राजस्थानी, तामीळ-तेलुगूबरोबर मोल्सवर्थचा मराठी-इंग्रजी कोश आहे. संगणकातील क्लृप्त्यांमुळे माहितीशोध सुलभ व निमिषार्धात होतो. स्वामित्वहक्क कायद्यामुळे आज जुन्या-पुराण्या कोशांचे अंकीकरण मोठ्या प्रमाणात होते आहे. खुद्द प्रकाशकांकडून/लेखकांकडून नव्या कोशांचे सी.डी.त रूपांतर होणे काळास अनुसरून होईल. कोशवाङ्मयाचा प्रसार त्यामुळे वाढेल.

कोशासाठी लिहिणे ही मोठी जबाबदारी आहे. मराठी कोश निर्माण करताना — विशेषतः ज्ञानकोश — भाषाप्रामाण्याचा विचार करावा लागतो. त्यामुळेच शासनाच्या मराठी विश्वकोश प्रकल्पाने परिभाषा खंड प्रथम काढला. ज्ञानवर्धनाचे उद्दिष्ट समोर ठेवणाऱ्या ह्या कोशांतील भाषा, ज्ञानभाषाच हवी. ज्या ज्ञानशाखांतर्गत विषयाचा कोश असेल, त्यातील आशय परिणामकारकरीत्या वाचकापर्यंत नेता येईल इतकी ती पुष्ट हवी. त्या विषयाचे स्पष्टीकरण, विश्लेषण, वर्णन अचूक होईल इतकी ती लवचिक हवी. वर्णनविषयाचे सारे विशेष : संज्ञा, संकल्पना, तत्त्वे, प्रमेये इ०

उचित शब्दांत व्यक्त करणारी हवी. अशा ज्ञानभाषेत विषयतज्ज्ञांनी कोशासाठी लिहिणे अपेक्षित आहे. काही मान्यताप्राप्त ज्ञानकोशांच्या प्रसिद्धीपत्रकांत आमच्या लेखकांत २५% लेखक नोबेल पारितोषिक विजेते आहेत, असे अभिमानाने सांगितले जाते. कोशांतील मजकूर 'कापा व चिकटवा' ह्या पद्धतीने लिहिला गेल्यास भाषासौंदर्य नष्ट होते. कोशांतील लेखनाचा दुसरा विशेष म्हणजे ते जिज्ञासू सर्वसामान्य व अभ्यासक-संशोधक ह्या दोन्ही प्रकारच्या वाचकांसाठी केलेले असावे. ते दुर्बोध, कळण्यास कठीण नसावे, तसेच हलके-फुलकेही नसावे. ज्ञानभाषेचा बाज असणारी पण सर्व प्रकारच्या वाचकांना आकळणारी भाषा हवी. आदर्श कोशनिर्मितीत आशयाबरोबर भाषेचे महत्त्व जाणले पाहिजे. विविध विषयावरील भिन्न प्रकृतीचे कोश हे भान राखून तयार झाले, होत गेले, तर मराठी भाषा अधिकाधिक समृद्ध होत जाईल. ■

'मुलुंड दर्शन', एफ्/१४६, मुलुंड कॉलनी, गुरू गोविंदसिंग मार्ग, मुलुंड(प),
मुंबई ४०००८२. दूरध्वनी : २५६५४३९४

बांगला भाषेतलं समाजशास्त्रावरचं लेखन एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला सुरू झालं. आणि त्या शतकाच्या उत्तरार्धात बंगालमधलं समग्र वैचारिक लेखन बांगला भाषेत लिहिलं जाऊ लागलं. परंपरा, सुधारणा, आधुनिकता वसाहतवाद असे सर्व विषय बांगलामध्ये चर्चिले जात होते. हे लिखाण करणाऱ्या बहुतेकांवर आधुनिक पाश्चिमात्य विचारधारेचा प्रभाव होता खरा; पण त्यांना या विचारांची व सिद्धान्ताची भारतीय वस्तुस्थितीच्या संदर्भात चर्चा करायची होती आणि मुख्य म्हणजे हे विचार विद्यापीठाच्या अकॅडमिक वाचकवर्गापुरतेच नाही तर सर्वसामान्य जनतेपर्यंत नेण्याची त्यांची आकांक्षा होती. यामुळेच ते यासाठी आवश्यक असलेली नवीन भाषा स्थापित करण्यात यशस्वी झाले. त्यांचं वैचारिक लिखाण हे पाश्चिमात्य विचारांची नक्कल नव्हतं किंवा त्याचा अनुवाद नव्हता तर मौलिक सर्जन होतं. म्हणूनच आजच्या समाजशास्त्रज्ञांनाही इंग्रजीतून लिहिताना बांगला भाषेतल्या त्या वेळच्या लिखाणाचा विचार करावा लागतो. विरोधाभास म्हणजे स्वातंत्र्यानंतर जेव्हा विद्यापीठांतून आणि महाविद्यालयांतून बांगला भाषेत समाजशास्त्र शिकवलं जाऊ लागलं, तेव्हा मात्र अशा लिखाणाचा दर्जा उतरणीला लागला. इंग्रजी पाठ्यपुस्तकांचं भाषांतर असलेली, एकही मौलिक विचार नसलेली बांगला भाषेतील पाठ्यपुस्तकं निघू लागली. आजही परिस्थिती तशीच आहे. बांगला भाषेत निघणाऱ्या या पुस्तकांचा व्यापक पातळीवर सर्वसामान्य जनतेशी, सार्वजनिक जीवनात घडणाऱ्या वादविवादांशी किंवा चर्चांशी कसलाही संबंध राहिलेला नाही. ही पुस्तकं फक्त परीक्षा पास होऊ इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी लिहिली जाताहेत.

**पार्थ चॅटर्जी**, वाङ्मय वृत्त, जुलै २००३

# चुकते कोठे ?

## नभोवाणी व चित्रवाणीवरील मराठी बातमीपत्रांतील भाषिक चुकांचा अभ्यास

**उज्ज्वला बर्वे**

प्रसारमाध्यमे माहितीच्या प्रसाराबरोबरच भाषेचाही प्रसार करत असतात. अनेक नवे शब्द व संज्ञा तयार करून त्या रूढ करण्यात प्रसारमाध्यमांचा मोठा वाटा असतो, हे गेल्या अनेक वर्षांच्या अनुभवावरून निदर्शनाला आले आहे. विशेषतः नभोवाणी व चित्रवाणी या माध्यमांतून बोलभाषेचा प्रसार झपाट्याने होतो. म्हणून प्रसार-माध्यमांनी प्रमाण व शास्त्रशुद्ध भाषा वापरावी असा संकेत आहे व तशी परंपराही आहे. परंतु अलीकडच्या काळात नभोवाणी व चित्रवाणीवरील मराठी बातमीपत्रांत वरचेवर आढळणाऱ्या विविध प्रकारच्या भाषिक चुकांमुळे अनेक मराठीप्रेमी श्रोते व प्रेक्षक अस्वस्थ होतात, त्याविषयी चर्चा करतात आणि वर्तमानपत्रांत त्याविषयी पत्रेही लिहितात.

मात्र या चुकांचा आत्तापर्यंत पद्धतशीरपणे फारसा अभ्यास झालेला नाही. या माध्यमांना असलेल्या काही मर्यादा (वेळेचे बंधन, थेट प्रक्षेपण, तरुण अननुभवी पत्रकार इ०) जरी मान्य केल्या तरीही त्यांच्याकडून अचूकतेची अपेक्षा ठेवणे अवास्तव नाही. या माध्यमांचा प्रचंड मोठा प्रेक्षकवर्ग लक्षात घेता त्यांच्यावर, विशेषतः तरुण पिढीवर, माध्यमांतील भाषिक रचनांचा व उच्चारांचा मोठ्या प्रमाणावर परिणाम होत असावा असे म्हणण्यास वाव आहे. भाषेचा वारसा जपण्याची व पुढे नेण्याची जबाबदारी तरुण पिढीवर असते. आज ही पिढी चित्रवाणीवर पोसली जात आहे. त्यांच्या कानांवर मराठी भाषेचे योग्य संस्कार होत आहेत की नाही हे पाहण्यासाठी दोन वर्षांपूर्वी मी एक संशोधन-प्रकल्प हाती घेतला. या प्रकल्पासाठी विद्यापीठ अनुदान आयोगाचे अर्थसाहाय्य मिळाल्याने साहाय्यकाची नियुक्ती करून बातमीपत्रे ध्वनिमुद्रित किंवा ध्वनिचित्रमुद्रित करणे व नंतर ती लिहून काढणे शक्य झाले.

या संशोधनाला केवळ सैद्धान्तिक मूल्य आहे असे नव्हे. व्यावहारिक पातळीवरही त्याचा उपयोग होऊ शकतो. संशोधनाचे निष्कर्ष संबंधित वाहिन्यांना उपलब्ध झाल्यास त्यांना (तशी इच्छा असल्यास) बातमीपत्रांत योग्य त्या सुधारणा करणे शक्य होईल असाही विचार मनात होता. विषयाचे नवेपण, त्याचे मराठी भाषेच्या दृष्टीने असलेले महत्त्व आणि त्याचा व्यावहारिक उपयोग या सर्वांमुळे हा संशोधन-प्रकल्प हाती घेणे

महत्त्वाचे वाटले.

श्रोता बातमीपत्र एकदाच ऐकतो, पाहतो. पहिल्यांदा मजकूर कळला नाही तर तो पुन्हा ऐकण्याची सोय त्याला उपलब्ध नसते. त्यामुळे पहिल्यांदा ऐकताच श्रोत्याला कळेल अशा तऱ्हेने बातमी लिहिली पाहिजे.

सोप्या पद्धतीने बातमी लिहिण्याचे इंग्रजी पाठ्यपुस्तकांत आढळणारे काही मार्ग पुढे दिले आहेत.

• लहान, सुटसुटीत वाक्ये लिहिणे. • श्रोते दैनंदिन संभाषणात जे शब्द वापरतात तेच बातमीपत्रात वापरणे. • तारीख, महिना, वर्ष असा तपशील देण्याऐवजी उद्या, पुढच्या महिन्यात असे शब्दप्रयोग करणे. • आकडेवारी शक्यतो पूर्ण आकड्यात (दशक, शतक, सहस्र या रूपात) सांगणे. • दोन आकड्यांमध्ये तुलना असेल तर टक्केवारी, पट या भाषेत सांगणे. • समान उच्चारांचे पण भिन्न अर्थांचे शब्द टाळणे किंवा काळजीपूर्वक वापरणे. • दोन भिन्न शब्द एकापाठोपाठ आल्यानं काही विपरीत अर्थ निर्माण होत नाही ना हे पाहणे. • अनावश्यक द्विरुक्ती टाळणे. • नकारार्थी रचना टाळणे. • कर्मकर्तरी रचना टाळणे.

दृक्‌श्राव्य माध्यमांसाठी चांगले कसे लिहावे याबाबत मराठी भाषेतूनही मार्गदर्शक लेखन झाले आहे. यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाच्या नभोवाणी व चित्रवाणी या विषयांच्या पाठ्यपुस्तकांत त्याविषयी काही मार्गदर्शक तत्त्वे सापडतात. त्याचप्रमाणे 'पावले पत्रकारितेची' या प्रशिक्षण-पुस्तिकेतही श्राव्य माध्यमांसाठी लेखन कसे करावे याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. वर सांगितलेले सर्व मुद्दे मराठी भाषेतील वृत्तलेखनाला लागू पडतातच, त्याखेरीज मराठी भाषेचे स्वरूप लक्षात घेता आणखी खबरदारी घेणे आवश्यक आहे, असे त्या पुस्तकांत/लेखांत नमूद करण्यात आले आहे. त्यांपैकी काही पुढीलप्रमाणे :

• संभाषणात्मक लिहावे व तसेच वाचावे : उदा० 'असे झाले' असे न लिहिता 'असं झालं' असे संहितेत लिहावे (मात्र 'अस झाल' असे शेवटच्या शब्दावर अनुस्वार/शीर्षबिंदू न देता लिहिले गेले तर वाचताना चूक होण्याची शक्यता असते.)

• 'व' हे उभयान्वयी अव्यय न वापरता संभाषणात्मक शैलीप्रमाणे 'आणि' वापरावे.

• संभाषणात्मक शैली असली तरी ती पूर्णत: अनौपचारिक असू नये. बातमीपत्रांच्या लेखनात औचित्यसाठी आवश्यक तेथे प्रमाण भाषा, औपचारिकता यांचा वापर करावा.

या अभ्यासासाठी मी सहा वाहिन्यांनी प्रसारित केलेल्या एकूण अठरा बातमीपत्रांचा सविस्तर अभ्यास केला. त्यांत आकाशवाणीच्या तीन केंद्रांवरील (पुणे, मुंबई आणि दिल्ली) प्रत्येकी तीन याप्रमाणे नऊ बातमीपत्रे तर सह्याद्री (दूरदर्शन), अल्फा

टीव्ही मराठी आणि ई टीव्ही मराठी या चित्रवाणी वाहिन्यांवरील प्रत्येकी तीन याप्रमाणे नऊ बातमीपत्रे होती. प्रसारित झालेली बातमीपत्रे ध्वनिमुद्रित किंवा ध्वनिचित्रमुद्रित करून त्यांचा मजकूर जसा ऐकायला आला त्याप्रमाणे त्यांची संहिता लिहून काढली. विविध वाहिन्यांवरील बातमीपत्रे निवडण्यामागे प्रातिनिधिकता आणि वैविध्य हे हेतू होते. एकाच वाहिनीवर लक्ष केंद्रित करून निष्कर्ष काढण्यापेक्षा अधिक व्यापक स्वरूपाचा नमुना गोळा करून 'मराठी भाषेतील बातमीपत्रे' या समावेशक शीर्षकाने त्यांचा अभ्यास करणे अधिक सयुक्तिक वाटले. नमुना विविध वाहिन्यांवरून घेतला असला तरी त्या वाहिन्यांची एकमेकांशी तुलना करण्याचा हेतू नव्हता.

अभ्यास करताना संहितेतील प्रत्येक वाक्य काळजीपूर्वक तपासले. वाक्यातील संदर्भानुसार व अपेक्षित अर्थानुसार शब्दयोजना योग्य आहे की नाही, वाक्यातील अर्थानुसार शब्दक्रम आहे की नाही व व्याकरणाचे नियम योग्य रीतीने पाळले आहेत की नाही हे काटेकोरपणे तपासले. वृत्तपत्रीय लेखनाचे जसे काही संकेत असतात तसे नभोवाणी व चित्रवाणी या माध्यमांसाठीही काही संकेत मानले जातात. उच्चारलेला मजकूर श्रोत्यांना लगेच कळावा यासाठी ते संकेत अस्तित्वात आले. त्या संकेतांनुसार या बातमीपत्रांची भाषाशैली आहे की नाही हेही तपासले.

बातमीपत्रांत आढळलेल्या चुकांचे पुढीलप्रमाणे वर्गीकरण केले :

प्रकार १ : शब्दयोजनेतील चुका

| क्र. | वर्णन |
|---|---|
| १ अ | अयोग्य नाम |
| १ आ | अयोग्य क्रियापद |
| १ इ | अयोग्य विशेषण |
| १ ई | अयोग्य शब्दरूप |
| १ उ | अनावश्यक संधी/समास |

प्रकार २ : वाक्यरचनेतील चुका

| क्र. | वर्णन |
|---|---|
| २ अ | वाक्यात कर्ता किंवा कर्म यांचा अभाव |
| २ आ | अयोग्य शब्दक्रम |
| २ इ | कर्मकर्तरी रचनेचा वापर |
| २ ई | लांबलचक व गुंतागुंतीची वाक्यरचना |

प्रकार ३ : व्याकरणातील चुका

| क्र. | वर्णन |
|---|---|
| ३ अ | अयोग्य सर्वनामे व अव्यये |
| ३ आ | अयोग्य प्रत्यय किंवा प्रत्ययाचा अयोग्य वापर |
| ३ इ | क्रियापदाचे अयोग्य रूप |
| ३ ई | अयोग्य वचनरूप |

प्रकार ४ : श्राव्य/दृक्श्राव्य माध्यमाला अनुचित शैली

| क्र. | वर्णन |
|---|---|
| ४ अ | अति अनौपचारिक शैली |
| ४ आ | लिखित शैली |
| ४ इ | अप्रचलित/अल्पप्रचलित/कठीण शब्दांचा वापर |
| ४ ई | हिंदी/इंग्रजी धाटणीचे लेखन |
| ४ उ | प्रचलित मराठी शब्द उपलब्ध असताना अन्य भाषेतील शब्दाचा वापर |
| ४ ऊ | रचनेतील विसंगती |
| ४ ए | शब्दांची पुनरुक्ती |
| ४ ऐ | अयोग्य भाषांतर |

वरील वर्गवारीनुसार चुकांची एकूण संख्या पुढीलप्रमाणे आढळली :

| गट १ | गट २ | गट ३ | गट ४ | एकूण |
|---|---|---|---|---|
| शब्दयोजनेतील चुका | वाक्यरचनेतील चुका | व्याकरणातील चुका | श्राव्य माध्यमाला अनुचित शैली | |
| ६६ | ५५ | ६४ | ११५ | ३०० |

निर्दोष लेखनासाठी काही मार्ग सुचवण्याचे ध्येय डोळ्यांसमोर ठेवण्यात आले होते. केवळ चुका शोधून न थांबता, जी शब्दयोजना किंवा वाक्यरचना चुकीची वाटते तिला अचूक पर्याय काय असू शकतो (किंवा शकतात) ते शोधण्याचा प्रयत्न केला. अचूक पर्याय शोधण्याच्या प्रयत्नामुळे लेखनातील चुका कशामुळे होत असतील आणि त्या कशा टाळता येतील याविषयी भाष्य करणे शक्य झाले.

मजकुराचे विश्लेषण करताना मूळ मजकूर, त्यातील चुकीचा भाग व त्याचा योग्य पर्याय या क्रमाने सर्व चुकांची नोंद केली. उदाहरणादाखल एका बातमीपत्रातील काही भाग खाली दिला आहे. नोंदी करताना वाक्यातील चुकीचा भाग फक्त दिला आहे (बातमीचा किंवा वाक्याचा संदर्भ नसूनही या चुकांचे स्वरूप लक्षात येईल, असे वाटते.) आणि संबंधित मजकूर अधोरेखित केला आहे.

| **मूळ मजकूर** | **योग्य पर्याय** | **वर्गीकरणक्रम व वितरण** |
|---|---|---|
| लोकशाही वाचवण्या*साठी,* तिचा विकास करण्या*साठी* आणि दहशतवादाचा नि:पात करण्या*साठी*---- | लोकशाही वाचवणं, तिचा विकास करणं आणि दहशतवादाचा नि:पात करणं *यासाठी* | ४ ए - शब्दांची पुनरुक्ती |
| *अखिल भारतीय* पीठासीन अधिकाऱ्यांच्या ६६व्या परिषदेत---- | पीठासीन अधिकाऱ्यांच्या ६६व्या *अखिल भारतीय* परिषदेत--- | २ आ- अयोग्य शब्दक्रम |
| देश महत्त्वाच्या *घटनाक्रमातून मार्गक्रमण* करत आहे. | देशात महत्त्वाच्या *घटना घडत आहेत* | ४ इ- कठीण शब्दांचा वापर<br>४ ए- पुनरुक्ती |
| *ते म्हणाले,* 'केवळ---' असं *ते पुढं म्हणाले.* | 'केवळ---' असं ते पुढं म्हणाले. | ४ ए- 'ते म्हणाले'ची पुनरुक्ती |
| दुष्काळी *स्थितीचा* अर्थव्यवस्थेवर *होणाऱ्या* परिणामावर--- | १) दुष्काळी स्थितीचा अर्थव्यवस्थेवर *काय परिणाम* होतो याकडे लक्ष---<br>२) दुष्काळी स्थितीच्या अर्थव्यवस्थेवरील परिणामावर लक्ष--- | २ ई- लांबलचक व गुंतागुंतीची रचना<br>३ आ- चुकीचा प्रत्यय |
| *मिलिटरी स्कूलच्या* अध्यक्षपदाची--- | *सैनिकी/लष्करी प्रशालेच्या* ----- | ४ उ- प्रचलित मराठी शब्द असताना परभाषेतील शब्दाचा वापर |
| मिळवून दिल्यात, स्पष्ट झालंय् | (क्वचितच असा अनौपचारिक उच्चार) | ४ अ- अति अनौपचारिक शैली |

| मूळ मजकूर | योग्य पर्याय | वर्गीकरणक्रम व वितरण |
| --- | --- | --- |
| '------ *बोलावण्यापूर्वी त्याची पोलिसांनी* जबानी नोंदवावी-- | ------ *बोलावण्यापूर्वी पोलिसांनी त्याची* जबानी नोंदवावी-- | २ आ- अयोग्य शब्दक्रम |
| वैद्यकीय सेवेतल्या *कर्मचाऱ्यांनी प्रशिक्षित झालं* पाहिजे--- | वैद्यकीय सेवेतल्या *कर्मचाऱ्यांनी प्रशिक्षण घेतलं* पाहिजे--- | २ इ- कर्मकर्तरी रचनेचा वापर |
| *आजारांशी आळा* घालण्यासाठी---- | *आजारांना आळा* घालण्यासाठी---- | ३ आ- चुकीचा प्रत्यय |
| केंद्रानं *घरातल्या दूरध्वनींचे* दर---- | स्थिर दूरध्वनींचे दर---- | ४ ऐ- 'लॅण्ड लाइन'चं अयोग्य भाषांतर |
| टंचाई *निवारणांच्या* कामांचा---- | टंचाई *निवारणाच्या* कामाचा---- | ३ ई- अयोग्य वचनरूप (निवारण शब्द अनेकवचनात वापरता येत नाही) |
| *टंचाईच्या कामांना* पैशाची कमतरता---- | *टंचाईच्या निवारणाच्या कामांना* पैशाची---- | १ अ- अयोग्य नाम (निवारण हे नाम गाळले) |
| त्याच्यावर आज *पोटासह* अन्य कायद्यांखाली गुन्हा दाखल करून त्याला आज न्यायालयासमोर- | पोटा आणि अन्य काही कायद्यांखाली त्याच्यावर गुन्हा दाखल करून त्याला आज न्यायालयात---- | २ आ- अयोग्य व गोंधळात टाकणारा शब्दक्रम. कायद्याच्या इंग्रजी आद्याक्षरांनी तयार झालेला शब्द व 'पोट' हा मराठी शब्द यांत गोंधळ होण्याची शक्यता. |

**निष्कर्ष :**

योग्य शब्दयोजना व असंदिग्ध वाक्यरचना यांबद्दल बातमीपत्रांचे लेखक व संपादक आग्रही नाहीत असे या अभ्यासावरून दिसून येते. 'तपास' म्हणायचे आहे तिथे 'तपासणी' म्हणणे, 'उरलेल्या' किंवा 'बाकीच्या' या अर्थाने सर्व ठिकाणी 'उर्वरित' हा शब्द वापरणे अशा उदाहरणांवरून त्यांची शब्दसंपदा मर्यादित असल्याचे, शब्दांतील बारकावे त्यांना माहीत नसल्याचे आणि वाक्यरचनेवर त्यांनी हुकुमत नसल्याचे लक्षात येते. तीच गोष्ट विशेषणांच्या बाबतीत- 'आक्रमक (चिंतन), कठोर (चौकशी)' अशा विशेषणांतून वृत्तलेखकाला नेमके काय म्हणायचे आहे ते लक्षात येत नाही. शब्दसंपदा वाढवणे, वाक्यातील शब्दक्रम, शब्दांची सामान्यरूपे, विभक्तीप्रत्यय आणि वाक्यरचना यांचा अभ्यास करणे हा त्यावरचा एकमेव उपाय आहे.

वाक्यरचनेच्या चुकांपैकी बहुतेक सर्व चुका थोड्या प्रयत्नांनी टाळता येण्यासारख्या आहेत. वृत्तपत्रीय किंवा अन्य लिखित मजकुरात विरामचिन्हांचा जसा उपयोग होतो तसा दृक्‌श्राव्य माध्यमांसाठी करावयाच्या लेखनात होऊ शकत नाही हे एकदा वृत्तलेखकांच्या मनावर बिंबले की मग आपोआपच तार्किकदृष्ट्या परस्परांशी संबंधित शब्द किंवा वाक्यघटक एकापाठोपाठ योजिले जातील. म्हणजे मग 'आरोपी फरागो तीन दिवस झाले तरी त्याला--' असे लिहिण्याऐवजी 'तीन दिवस झाले तरी आरोपी फरागो याला' असे लिहिले जाईल.

मराठीत कर्मकर्तरी रचना कृत्रिम वाटते व आपण मराठीत बोलताना शक्यतो तसे बोलत नाही. परंतु वृत्तकक्षांकडे येणारा बराचसा मूळ मजकूर इंग्रजीत असल्याने त्यानुसार वाक्यरचना करण्याकडे भाषांतरकारांचा कल असतो. त्यामुळे '...यांच्या हस्ते उद्घाटन झालं', 'पुणे महानगरपालिकेतर्फे भरीव सवलती देण्यात येणार...' ('--यांनी उद्घाटन केलं.', 'पुणे महानगरपालिका भरीव सवलती देणार' यांऐवजी) अशा रचना वृत्तलेखक करतात.

वाक्यात कर्ता किंवा कर्मच घालायचे राहून जाणे या प्रकारची व्याकरणाची चूक टाळणे तर अगदी सहज शक्य आहे. वृत्तकक्षांनी थोडी शिस्त लावून प्रत्येक बातमीचा मसुदा मूळ वृत्तलेखकाखेरीज दुसऱ्या वृत्तलेखकाने वाचण्याची पद्धत अंमलात आणली तर अशी वाक्ये नजरेतून निसटणार नाहीत. वास्तविक पाहता वृत्तनिवेदकाच्या नजरेखालून सर्व मजकूर जातोच. त्याने स्वत:च्या अधिकारात अशा किरकोळ चुका दुरुस्त करणे आवश्यक आहे. चुकीची अव्यये, प्रत्यय, वचनरूपे, लिंगे यांबाबत कोणतीही तडजोड चालणार नाही व आवश्यक असल्यास त्या सर्वांचा पुन्हा रीतसर अभ्यास करावा लागेल हे वृत्तलेखकांना पटवणे अशा उदाहरणांमुळे आवश्यक वाटते.

दृक्‌श्राव्यमाध्यमाला अनुचित अशा शैलीची उदाहरणे सर्वाधिक सापडली. अवघड शब्दांचा वापर, हिंदी/इंग्रजी वळणाच्या मराठी रचना, मराठी शब्द असताना इंग्रजी/हिंदी शब्द वापरणे, काही विशिष्ट शब्द वरचेवर वापरणे यांमुळे ही शैली ऐकायला अयोग्य वाटते. परंतु शब्दयोजना, वाक्यरचना आणि व्याकरण या तीन महत्त्वाच्या पैलूंवर जोवर वृत्तलेखक आणि निवेदक प्रभुत्व मिळवत नाही तोवर शैलीसौष्ठवाची अपेक्षा करणे कदाचित वावगे ठरेल.

(टीप : मी सध्या या विषयासंबंधी अधिक विस्तारपूर्वक संशोधन करीत आहे. ते निर्दोष व्हावे यासाठी जाणकारांनी सूचना कराव्यात अशी विनंती आहे.) ■

८, मनीषा पार्क, १६९ डहाणूकर कॉलनी, कोथरूड, पुणे ४११०३८.
दूरध्वनी : २५३९४६३७, ९८२३२८४२०४





अनुक्रमणिका

# विज्ञानलेखनाच्या शैलीसंबंधी

**दिलीप धोंडगे**

विज्ञानलेखनाची शैली या विषयाची चर्चा करताना पुढील तीन मुद्दे प्रथमतः ध्यानात घेणे आवश्यक आहे. (१) विज्ञानविषयक ललितेतर लेखन हे सैद्धान्तिक लेख, तात्कालिक महत्त्वाच्या वैज्ञानिक घडामोडींची माहिती देणारे लेख, शास्त्रज्ञांची चरित्रे कथन करणारे लेख, विज्ञानविषयक संशोधनासाठी कार्यरत असलेल्या राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय संस्थांमधील संशोधनाची माहिती पुरविणारे लेख, विज्ञानविषयक चर्चांचे सारांश देणारी टिपणे वगैरे स्वरूपाचे असते. (२) विज्ञानविषयक ललितलेखन हे कथा, कादंबरी, ललित गद्य या माध्यमांतून आविष्कृत होते. (३) विज्ञानलेखन या शब्दप्रयोगात ललित व ललितेतर या दोन्ही प्रकारच्या लेखनांचा समावेश होतो. मात्र शैलीचा विचार करताना या दोन्ही लेखनांचा स्वतंत्रपणे विचार करावा लागतो. शैलीचा विचार हा ललितलेखनाच्या संदर्भात जेवढा होतो तेवढा ललितेतर लेखनाच्या संदर्भात होत नाही. ललितेतर लेखनाच्या भाषेची व्याकरणिक वैशिष्ट्ये हीच शैलीगत मानून त्यांची नोंद केली जाते.

ललितलेखनात भाषेचा सर्जनशील वापर होतो. परिणामतः व्यवहारात एरव्ही साधन म्हणून कार्य करणारी भाषा ललितलेखनात माध्यम होते. ललितकलाकृतीचे रूप आणि आशय हे भाषिक असते. पण रूप आणि आशय यांच्या परस्परसंबंधातून जे भाषिक द्रव्य साकार होते ते माध्यमरूप असते. त्या माध्यमाच्या माध्यमातूनच कलाकृतीचे वाचन करावे लागते. या माध्यमरूप भाषेत अनेक भाषिक निकषांची निर्मिती होते. या भाषिक निकषांना अर्थातच कलामूल्य असते. या भाषिक निकषांना काही चल पदेही (व्हेरियण्ट) असतात. चल घटकांचे कार्य विपथनात्मक (डेव्हिएटिड) असते तर भाषिक निकषांचे कार्य हे संदर्भ उभे करण्याचे असते. भाषिक निकष आणि चल पदे यांचा परस्परसंबंध बहुविध प्रकारचा आणि संदिग्ध असतो. यामुळे भाषिक निकष आणि चल पदे यांचा शोध हा काळजीपूर्वक घ्यावा लागतो. ललितेतर लेखनात अनेक चल पदे असतात; पण त्यांना भाषिक निकषांची पार्श्वभूमी नसते त्यामुळे या चल पदांचे शैलीगत कार्य स्पष्ट करता येत नाही. या चलपदांना व्याकरणिक नियमांची पार्श्वभूमी असते त्यामुळे चल पदे शैलीगत न होता व्याकरणिकच ठरतात. व्याकरणिक नियम हे रूप आणि आशय यांच्या माध्यमाप्रत पोचलेल्या परस्परसंबंधांअभावी भाषिक

निकषांप्रत पोचू शकत नाहीत. भाषिक निकष हेही शैलीगत असतात हे ध्यानात घ्यावे लागते. या संदर्भात आणखी एक गोष्ट नमूद करायला पाहिजे. शैलीतत्त्व हे मानवी व्यवहारांशीही निगडित असल्यामुळे विशिष्ट समाजाच्या निकषांची पार्श्वभूमी त्याला असते. ही पार्श्वभूमी अर्थातच शैलीगत असते. मानवी व्यवहारातील चल घटक हे या निकषांशी संवादी-विरोधी अगर समांतरपणे कार्यशील होऊन वर्तत असतात.

या पार्श्वभूमीवर ललितेतर विज्ञानलेखनाचा विचार करू. प्रारंभापासून ते आजतागायत लिहिल्या जाणाऱ्या ललितेतर विज्ञानलेखनाच्या शैलीचा विचार करताना कुठे पार्श्वभूमी मांडत, कुठे वर्णनात्मक वैशिष्ट्यांची नोंद करत तर कुठे विविध पातळ्यांवर विश्लेषण करत जाऊ.

माऊंट स्टुअर्ट एलफिन्स्टनच्या प्रेरणेने आणि पुढाकाराने इ.स. १८२२मध्ये स्थापन झालेल्या 'मुंबईची हैंदशाळा शाळापुस्तक मंडळी' स्थापन झाल्यापासून देशी भाषांच्याद्वारे एतद्देशीय लोकांना भौतिक आणि इतर शास्त्रांचा परिचय करून देणे हे तिचे एक उद्दिष्ट होते. यासाठी या विषयांवर लहान लहान पुस्तके निर्माण करावीत अशी योजना होती. या योजनेतील बरीचशी पुस्तके अर्थातच भाषांतरित होती. एक उदाहरण पाहू. हरि केशवजी पाठारे यांचे 'सिद्धपदार्थ विज्ञानशास्त्रविषयक संवाद' हे इ.स. १८३३मधील पुस्तक मिसेस मार्सेट यांच्या 'कॉन्व्हर्सेशन्स इन नॅचरल फिलॉसफी' या इंग्रजी पुस्तकाचे भाषांतर होते. या पुस्तकाच्या निमित्ताने पदार्थविज्ञानाची परिभाषा प्रथमत:च हरि केशवजींना तयार करावी लागली. ती पुढीलप्रमाणे :

| | | | |
|---|---|---|---|
| Impenetrability | – निर्भेद्यता | Divisibility | – विभाज्यत्व |
| Density | – दाढर्य | Rarity | – वैरल्य |
| Elasticity | – नियताकारत्व | Weight | – उचाल्य |
| Attraction of cohesion | – स्नेहाकर्षत्व | Porosity | – सच्छिद्रता |
| Ascent of light bodies | – लघुपदार्थोर्ध्वगमन | Lever | – उच्चलन |
| Power | – उच्चालक | Momentum | – चालकत्व |
| Fulcrum | – टेंका | Convex | – गोलबाह्य |

इत्यादी. त्यांची भाषांतरित वाक्ये अशी :

(अ) 'बरे देवळास सोन्याचा कळस असतो तो कशाने चकाकतो ?'

'What is it that makes the steel buttons on your brother's coat shine?'

(आ) 'जगन्नाथ शंकरशेठचे घरात एक गोलबाह्य आरसा आहे, त्याजमध्ये दिवाण-खान्यातील सर्व वस्तूंची लहानलहान रमणीय प्रतिबिंबे दिसतात.'

'We have a convex mirror in the drawing-room, which forms a beautiful miniature picture of the objects in the room'

या ग्रंथाची रचना, त्यातील शब्द, वाक्ये वगैरेंचे अवलोकन केल्यानंतर काही गोष्टी स्पष्ट होतात. त्या म्हणजे भाषांतरासाठी संस्कृत व मराठीचा आधार घेणे, वाक्यांच्या भाषांतरासाठी शब्दशः भाषांतराचा वापर न करता एतद्देशीय संदर्भनिकष उभे करणे, ग्रंथरचना अध्यायशः करणे, प्रारंभ आणि शेवट अनुक्रमे 'अथ प्रथम संवादः' व 'इति प्रथम संवादः' असा करणे, मूळ ग्रंथातील 'एमिली' व 'कॅरोलिन' या विद्यार्थिनींच्या जागी 'कृष्ण' व 'गोपाळ' ही नावे वापरणे इत्यादी. ही एक प्रकारे सांस्कृतिक पार्श्वभूमी असलेली चल पदे होत. (कुलकर्णी, १९६५) अपरिचित अशा विज्ञानविषयाच्या संदर्भनिकषांच्या चौकटीत ही चल पदे एकमेकांशी भाषिक परस्परसंबंध साधत कार्य करीत असतात. स्वतः शास्त्रज्ञ असलेल्या केरो लक्ष्मण छत्रे यांचे १८५७ सालचे 'पदार्थविज्ञानशास्त्र', त्यांची गणित विषयाची इतर पुस्तके, जर्विस यांनी तयार केलेली परिभाषा, विल्यम हेन्री बेल यांनी नारायणशास्त्री चौलकर यांच्या साहाय्याने लिहिलेले 'शिल्पविद्या' या विषयावरील १८५६ साली प्रसिद्ध केलेले निबंध,१८५३ सालचे गोविंद नारायण फडके यांचे 'यंत्रशास्त्राची मूळे', १८५६ साली प्रसिद्ध झालेला सखाराम रामचंद्र दीक्षित व विष्णू अमृतराव यांचा 'शास्त्रीय ज्ञानदर्शन' हा ग्रंथ इत्यादी सर्व पुस्तकांचे वैशिष्ट्य म्हणजे यांतून झालेली परिभाषानिर्मिती हे होय. उदाहरणार्थ : 'शास्त्रीय ज्ञानदर्शन' या पुस्तकातील परिभाषा पहा (कुलकर्णी, १९६५) :

| | | | |
|---|---|---|---|
| Focus | — बिंदुस्थान | Nitric Acid | — आगपाणी |
| Hospital | — रोगिशाला | Safety Lamp | — सुरक्षक दीप |

संस्कृत भाषेच्या साहाय्याने तयार केलेले हे नवीन शब्द नवीन चल पदे म्हणून ध्यानात घ्यावी लागतात. मूळ इंग्रजी शब्दांच्या संदर्भनिकषांच्या पार्श्वभूमीवर ही चल पदे लक्षात घ्यावी लागतात. याच मूळ इंग्रजी शब्दांचे आजचे नवीन प्रतिशब्द हे नवीन चल पदे म्हणून कार्यशील होतात व पूर्वीचे प्रतिशब्द हे निकषस्थानी जातात. याच्या उलटेही म्हणता येते. म्हणजे असे की : आजचा नवीन प्रतिशब्द हा निकष तर पूर्वीचा जुना प्रतिशब्द हे जुने चल पद असते. ऐतिहासिक भाषाविज्ञानाच्या साह्याने याचा वर्णनात्मक भाषाभ्यास करता येऊ शकतो. याच काळात जॉर्ज जर्विस, डॉ. मॅक्मेलन, हरि केशवजी, गोविंद नारायण माडगांवकर, कृष्णशास्त्री भाटवडेकर, बाळशास्त्री जांभेकर, गोपाळ हरि देशमुख ऊर्फ लोकहितवादी प्रभृती मंडळी वैद्यक, अर्थशास्त्र, भूगोल वगैरे विषयांसंबंधी लेखन करून प्राधान्याने परिभाषा घडवीत होती.

शैलीगत इतर वैशिष्ट्यांचे दर्शन घडावे म्हणून एखादा उतारा तपासता येईल. गोविंद गंगाधर फडके यांच्या 'यंत्रशास्त्राची मूळे' (१८५३) या ग्रंथातील पुढील

उतारा पहा :

''यावरून असे दिसते की फिरविण्याचा दांडा जितका लांब असेल आणि मळसूत्राची सूत्रे जितकी अतिजवळ असतील, तितकी त्या मळसूत्राची शक्ती अधिक होईल; म्हणून या यंत्राचे यांत्रिक सामर्थ्य वाढविण्यासाठी, ज्या उच्चालकाने शक्ती लागू होते त्याची लांबी वाढवावी, अथवा सूत्रांमधील अंतर कमी करावे. उदाहरण, सारख्या परिघाच्या दांड्याची दोन मळसूत्रे आहेत. त्यात जर एकाचे सूत्रांमधील अंतर १ इंच आणि दुसऱ्याचे सूत्रांमधील अंतर ३ इंच असेल तर, उतरणीचा मूळ कारणाचा विचार केल्याने असे दिसेल की, ज्या मळसूत्राच्या सूत्राचे अंतर ३ इंच आहे, त्यापेक्षा ज्याचे सूत्राचे अंतर १ इंच आहे, त्यापासून तिप्पट नफा होईल. जर दोन उतरणींची उंची सारखीच आहे, परंतु त्यातून एका उतरणीचा पायाचा तिप्पट दुसरीचा पाया आहे, तर लांब पायाचा उतरणीपासून जो यांत्रिक नफा होईल, तो दुसरीचा नफ्याचा तिप्पट होईल. परंतु त्या उतरणीचा उंचीवर पोचण्यास तितका काळ अधिक लागेल हे पूर्वी दाखविले आहे. काही अवकाशातून जाण्यास ३ इंच सूत्रांतराचा मळसूत्रास जितक्या वेळा फिरावे लागेल, त्याचा तिप्पट वेळा १ इंच सूत्रांतराचा मळसूत्रास त्याच स्थळांतून जाण्यास फिरावे लागेल, असे वरची गोष्ट मळसूत्रास लागू केल्याचे दिसेल. यावरून ज्या स्थळांतून गमन घडते अथवा जो काळाचा तोटा होतो, तो नफ्याशी प्रमाणात असतो...(नेमाडे, १९९० : १५२)

ह्या उताऱ्याचे विविध पातळ्यांवर विश्लेषण केल्यास बऱ्याच शैलीगत गोष्टी लक्षात येतात. या उताऱ्यातील वाक्ये ही संस्कृत आणि इंग्रजी वाक्यरचना यांच्या संमिश्रणातून सिद्ध झालेली आहेत. फिरविण्याचा दांडा, मळसूत्राची सूत्रे, यंत्राचे यांत्रिक सामर्थ्य, उच्चालक, परिघाचा दांडा, नफा होणे, यांत्रिक नफा, अवकाश, सूत्रांतर, गमन, काळाचा तोटा इत्यादी भाषांतरित शब्दबंध, अचेतन वस्तूंचे चेतनीकरण, कृतींचे व्यक्तिनिरपेक्ष वर्णन, अमूर्त नामांचा वापर अशी मिश्रभाषा घडणीची प्रक्रिया गतिमान झालेली दिसते. एका बाजूला मराठी भाषेचे इंग्रजीच्या प्रभावाने आणि संस्कृतच्या आधारे प्रमाणीकरण होत होते, मेजर कँडीसारखा विद्वान अत्यंत दक्षतेने हे काम करीत होता; आणि दुसऱ्या बाजूला विज्ञानविषयक लेखनासाठी याच आधार आणि प्रभावांनी मिश्रभाषा घडत होती. प्रमाणभाषा घडण्यासाठी मिश्रभाषा आणि व्यक्तिविशिष्ट उक्ती यांचे साहाय्य लाभत होते. ही प्रक्रिया अखंडपणे चालू राहिलेली दिसते. अगदी इ.स. १९२० साली प्रसिद्ध झालेल्या गो.के. दाते यांच्या 'विद्युत व विद्युतक्रेन' या पदार्थविज्ञानावरील पुस्तकापर्यंत ही प्रक्रिया दिसते. प्रश्नोत्तरस्वरूपाची संवादात्मक धाटणीची रचना, परिभाषानिर्मिती, मिश्रभाषेची घडण ही सर्व शैलीगत



अनुक्रमणिका

वैशिष्ट्ये विज्ञान-लेखनाची स्वतंत्र प्रमाणभाषा घडवीत होती.

आता निबंधवाङ्मयाच्या कालखंडाकडे वळू. या काळातील बहुतांश निबंधांद्वारा वैज्ञानिक दृष्टिकोण निर्माण करण्याचा उपक्रम सुरू झालेला होता. महात्मा फुले, विष्णुशास्त्री चिपळूणकर, स्वातंत्र्यवीर वि.दा. सावरकर, श्री.म. माटे, द.के. केळकर प्रभृत्तींचे लेखन या संदर्भात विचारात घ्यावे लागते. निबंध या लेखनरूपाची योजना करून अभिप्रेत विषय उपोद्घात, विषयोक्षेप, विषयविस्तार, समारोप अशा सर्वसाधारण घटकांतून मांडला जात असे. निबंधातून शुद्ध विज्ञानविषयक मुद्दे मांडण्यापेक्षा लोकभ्रम, अंधश्रद्धा यांकडे लक्ष देऊन उपयुक्ततावादाच्या अंगाने बौद्धिक पातळीवरून चर्चा करावयाची या धोरणामुळे विज्ञानविषयक पहिल्या कालखंडातील परिभाषासापेक्ष लेखनापेक्षा हे लेखन शैलीसापेक्ष व्हायला लागले होते. पुढे पहिल्या महायुद्धाच्या पार्श्वभूमीवर श्री.म. माटे यांनी 'विज्ञानबोधाची प्रस्तावना' (१९३४-३५) हा कोशरूप ग्रंथ शास्त्राभ्यासकांच्या मदतीने सिद्ध केला. श्री. माटे यांनी दोनशे पृष्ठांची प्रस्तावना लिहून प्रस्तावना-खंड सिद्ध केला. माट्यांच्या प्रस्तावनेत विज्ञानविषयक लेखनाचा शैलीसापेक्ष भाषाव्यवहार दिसतो. वैज्ञानिक व बौद्धिक दृष्टिकोण रुजविणे हे एकूण ध्येय असल्यामुळे निबंधवाङ्मय या अंगानेही बहरलेले दिसते. दुसऱ्या महायुद्धाच्या पार्श्वभूमीवरही मराठीत निबंधवाङ्मयाद्वारा विचारमंथन होत होते. बा.सी. मर्ढेकर यांच्यासारखा चतुरस्र साहित्यिकही आपल्या लेखनामधून आपले अनुभव मांडत होता. उदाहरणार्थ : मर्ढेकरांचा 'धूमकेतु' हा निबंध व 'फक्त तुझी जर दगडी भिवयी' ही कविता या लेखनांतून परिभाषासापेक्ष, व्यवहारसापेक्ष आणि शैलीसापेक्ष भाषाव्यवहाराचे दर्शन कसे घडते हे डॉ.अशोक रा.केळकर (१९८३ : १८४-६) यांनी लक्षात आणून दिले आहे. 'धूमकेतु' या निबंधातले दोन उतारे थोड्या फरकाने घेऊन तिसरा उतारा 'फक्त तुझी जर दगडी भिवयी' या कवितेतला घेतला, तर दुसरा उतारा पहिल्याच्या तुलनेने शैलीसापेक्ष आणि तिसऱ्या उताऱ्याच्या तुलनेने परिभाषासापेक्ष वाटला तर आश्चर्य वाटायला नको असे डॉ. केळकरांनी 'परिभाषेची परिभाषा' या लेखाच्या परिशिष्टाच्या प्रारंभीच स्पष्ट केले आहे. मर्ढेकरांच्या इतरही बऱ्याच कवितांमधील शब्द-पातळीवरील परिभाषा ही वैज्ञानिक अनुभव — द्वितीय महायुद्धोत्तर मानवी जगण्याचे अनुभव — व्यक्त करणारी आहे.

कालौघात विज्ञान विषयाला विद्यापीठीय अभ्यासक्रमात मिळालेले स्थान, स्वातंत्र्यानंतर देशाने पुरस्कारिलेले तंत्रज्ञानात्मक औद्योगिक धोरण यांमुळे विज्ञानाच्या प्रसाराला चालना मिळाली. देशी आधुनिक भाषांमध्ये या विषयावर स्वतंत्रपणे लेखन होऊ लागले. इ.स. १९२८ मध्येच 'सृष्टिज्ञान'सारखे नियतकालिक सुरू झाले.

चिं.श्री. कर्वे, ना.वा. कोगेकर, रा.वि. सोवनी प्रभृतींनी मराठीतून लेखन करून विज्ञानविषयक लेखनासाठी प्रोत्साहक वातावरण निर्माण केले. इ.स. १९६०मध्ये महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली. मराठी भाषेतूनच समग्र जीवनव्यापी भाषाव्यवहार करण्याचे धोरण निश्चित झाले. परिणामतः सरकारच्या विविध संस्थांनी क्षेत्रविशिष्ट मराठी परिभाषासंग्रह तयार करण्याचे उपक्रम हाती घेतले. काही स्वयंसेवी संस्थांनी चळवळ, नियतकालिके यांद्वारा विज्ञानप्रसाराचे कार्य सुरू केले. जयंत नारळीकर, वसंत गोवारीकर, रघुनाथ माशेलकर, बाळ फोंडके, निरंजन घाटे, लक्ष्मण लोंढे, सुबोध जावडेकर, शुभदा गोगटे प्रभृतींचे ललित व ललितेतर लेखन विज्ञानविषयक वातावरण गडद करीत होते व आजही करीत आहे. कथा, कादंबरी या प्रकारांतून विज्ञानविषयक ललित लेखनं होत आहे. विविध नियतकालिकांतील लेख, सदरांमधून होणारे स्फुट लेखन, वाचकांशी थेट संवाद साधणारे संवादात्मक लेखन यांद्वारा विज्ञानविषयक लेखन होताना दिसते. एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकांतील निबंध-वाङ्मयाशी नाते ठेवून पण शुद्ध विज्ञानविषयक लेख (ज्यांची गणना वैचारिक ललित गद्यात करता येते) या काळात लिहिले जात आहेत. एकोणिसाव्या शतकातील आणि विसाव्या शतकाच्या प्रारंभीच्या काही काळातील भाषा ही इंग्रजीच्या प्रभावाखाली घडणारी मिश्रभाषा होती. या काळातील भाषा ही अर्थातच प्रमाणित होऊन सर्व व्यवहारांची वाहक आणि माध्यम झालेली आहे. या भाषेला स्वतंत्र मराठी म्हणावे असे वळण प्राप्त झाल्याचे दिसते. एखाद्या लेखातील लेखननमुन्याचे विश्लेषण करून विवेचनाला स्पष्टता येईल. डॉ. जयंत नारळीकर (१९९९ : ४२-३) यांच्या ''पुराणातील विज्ञान विकासाची वांगी'' या लेखातील खालील उतारा आहे.

''आपल्याकडचे काही पौराणिक उल्लेख पाहिल्यानंतर ते विज्ञान-तंत्रज्ञान-प्रगत संस्कृतीचे निदर्शक वाटतात; पण तो केवळ ग्रह असतो. कारण जिज्ञासा-प्रयोग-निरीक्षण-कारणमीमांसा-भाकित या विज्ञानाच्या अतंस्थ प्रणालीचा त्याला आधार नसतो. परिणामतः त्यांना या पद्धतीने सिद्ध केल्याचे पुरावे कोठेही उपलब्ध होत नाहीत. रामायणातले पुष्पक विमान - आधुनिक हेलिकॉप्टर, घटोत्कचामागे कर्णाने सोडलेली इंद्राची शक्ती — गायडेड मिसाईल, धृतराष्ट्राला महाभारत युद्धाचे प्रत्यक्ष घडणारे वर्णन लांबून सांगणारा संजय - टी.व्ही. कॉमेण्टेटर, अंतराळात स्वैर संचार करणारे देवगंधर्व — स्पेस टेक्नॉलॉजी; शुक्राचार्य — मेडिसिन आणि सर्जरी यांत प्रगत. ही झाली प्रगत साम्याधिष्टित उदाहरणे. मूलभूत विज्ञान आणि गणित यांतही अशीच तंत्रज्ञानाची उदाहरणे सापडतात. वर्तुळाचे परीघ आणि व्यास यांचे प्रमाण सुमारे २२/७ इतके असते व या संख्येला 'पाय'ने दर्शविले जाते. आधुनिक

गणिताप्रमाणे 'पाय'ला 'ट्रान्सेन्डेंटल इर्रॅशनल' म्हणतात व ती संख्या दशांश पद्धतीत मांडली तर तिच्यातील आकड्यांचे आवर्तन किंवा आणखी कुठला नियमितपणा नसतो. अशी ही संख्या दशांशाच्या अनेक स्थानांपर्यंत मांडलेली पुरातन भारतीय गणितात सापडते असे म्हणतात.''

''आइनस्टानच्या प्रख्यात रिलेटिव्हिटी सिद्धान्तातून कालक्रमणेचा वेग निरीक्षकावर अवलंबून असतो हे दिसून आले. याचे प्रत्यन्तर एका आख्यायिकेत सापडते. रेवत राजाचा मुलगा कुकुदमी आपली कन्या रेवती हिला घेऊन ब्रह्मदेवाकडे गेला, कारण त्याला तिच्यासाठी योग्य वर शोधायला ब्रह्मदेवांचा सल्ला पाहिजे होता. ब्रह्मदेव काही कामात व्यस्त असल्याने ते दोघे काही क्षण तेथे थांबले. जेव्हा ब्रह्मदेव भेटले तेव्हा यांच्या येण्याचा उद्देश ऐकून हसले आणि म्हणाले : ''तुम्ही मनात ठेवलेले तरुण तर केव्हाच काळाच्या उदरात लुप्त झाले - कारण इथले काही क्षण म्हणजे पृथ्वीवरची चारी युगे सत्तावीस वेळा उलटून गेली !''

''क्वांटम थियरी ह्या विसाव्या शतकातल्या महत्त्वाच्या सिद्धान्ताची प्रतिबिंबे वैदिक, पौराणिक वाङ्मयात दिसतात. या सिद्धान्ताच्या मुळाशी असलेले 'अन्सर्टन्टी प्रिन्सिपल', प्रकाशाची दोन रूपे 'वेव्ह-पार्टिकल ड्युॲलिटी', 'अटॉमिक थियरी' वगैरे कल्पना आपल्या पुरातन पूर्वजांनी व्यक्त केलेल्या विचारांतून डोकावीत असतात.''

कल्पनेने स्फुरलेली पुराणातील तत्त्वे, पात्रप्रसंगाचे तत्कालीन वर्तन आणि त्याला समांतर वाटाव्यात अशा पाश्चात्य कल्पना यांच्या विरोधी ताणांतून काही शैलीगत तत्त्वे प्रस्थापित होतात. अवैज्ञानिक पौराणिक कल्पना आणि वैज्ञानिक पारिभाषिक संज्ञांमधून प्रकट झालेली प्रयोगसिद्ध वास्तविके यांतून हा ताण भाषिक पातळीवर कळतो. स्वत: लेखकानेही म्हटले आहे की, ''...आधुनिक विज्ञान आणि तंत्रज्ञानातले पारिभाषिक शब्द जाणूनबुजून वापरले आहेत. कारण त्यामुळे पाश्चात्य कल्पनांचे मूळ आपल्या पौर्वात्य वाङ्मयात होते हा दावा अधिक उठून दिसेल.''

डॉ. जयंत नारळीकर यांच्या लेखनातील आणखी एक नमुना पाहू.

'' 'मी सूर्य पश्चिमेस उगवताना पाहिला' हे विधान थाप मारल्यासारखे वाटेल; पण उत्तर-दक्षिण ध्रुवांना जोडणाऱ्या अक्षाभोवती फिरणारी पृथ्वी पश्चिमेकडून पूर्वेकडे परिभ्रमण करते म्हणून सूर्य पूर्वेकडून पश्चिमेकडे जाताना दिसतो, हे खगोलशास्त्रीय सत्य कसे बदलेल ? पण पृथ्वीच्या परिभ्रमणाची दिशा बदलली तर हे शक्य होते.'' असा नारळीकरांनी लंडन ते शिकागो या विमानप्रवासात घेतलेला आपला अनुभव नोंदला आहे. तो पुढील उताऱ्यात पाहू :

''पृथ्वीचा परिघ विषुववृत्तापासून सुमारे ४०,००० किलोमीटर आहे. त्यावरील कुठलाही बिंदू एका दिवसात ४०,००० किलोमीटर इतके परिभ्रमण करतो. म्हणजे त्याचा सरासरी वेग सुमारे ताशी १६०० कि.मी. इतका आहे. जसजसे आपण ध्रुवाकडे जाऊ तसतसा हा वेग कमी होत जातो. ६९ अंश अक्षांशाच्या वर्तुळावर हा वेग निम्म्यापर्यंत येतो तर ध्रुवावर शून्य असतो. आधुनिक जेट विमानांना ताशी ९०० कि.मी. वेग मर्यादा गाठणे अवघड नाही. तेव्हा अशा वेगाने जर आपण ६० अंश अक्षांशाच्या आसपास पश्चिमेकडे प्रवास केला तर पृथ्वीच्या परिभ्रमणाच्या वेगावर आपल्याला मात करता येते, तेव्हा अशा जेट विमान प्रवाशाला संध्याकाळच्या वेळी सूर्य पश्चिमेकडे उगवताना दिसतो.''

या उताऱ्यातील जवळपास प्रत्येक शब्द पारिभाषिक आहे. पूर्णपणे विज्ञानविषयक प्रमाणीकरण झालेल्या भाषेत केवळ तथ्ये मांडणारा हा उतारा आहे. परिभाषेचा वापर हा व्यवहारसापेक्ष पातळीवर होत असल्यामुळे हे लेखन शून्य निर्देशांकावरचे आहे. (डिग्री झीरो) पण एखादी विशिष्ट संदर्भचौकट लाभते तेव्हा हे लेखन शून्य निर्देशांकाकडून शैलीगत विशिष्ट निर्देशांक धारण करणारे होते. इथे निर्देशांक म्हणजे परिमाण अभिप्रेत आहे. वरील उतारा हा ''खगोलशास्त्रातील सुरस आणि चमत्कारिक गोष्टी'' या लेखातील आहे. शीर्षकावरून या उताऱ्याला कथात्मतेचा संदर्भनिकष प्राप्त झालेला असावा.

सुरुवातीच्या काळात विज्ञानविषयक लेखनाला सामाजिक पार्श्वभूमी नसल्यामुळे परिभाषा निर्माण होऊन ती रुजणे कठीण होते. विज्ञानविषयक लेखनाच्या बाबतीत वाचक हा घटक संदर्भ-निकषासारखा कार्यकर असतो. कथा, कादंबरी किंवा अन्य प्रकारांतून जरी विज्ञान लोकप्रिय करण्याचा प्रयत्न केला तरी केवळ सर्वसाधारण साक्षरता हा निकष महत्त्वाचा ठरत नाही. त्यासाठी विज्ञान-साक्षरता ही अट पूर्ण व्हावी लागते. विज्ञानच काय पण अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, कादंबरी, समीक्षा वगैरे क्षेत्रांनाही सामाजिक पार्श्वभूमी नसल्यामुळे पाश्चात्य साहित्यातील पारिभाषिक संज्ञांचे आदान मूळ धरू शकत नाही. मराठी भाषेच्या व्याकरणिक संरचनेशी त्यांचे समायोजन करण्याचा प्रयत्न केला तरी त्या संज्ञा मराठी भाषेच्या म्हणून गणल्या जात नाहीत. परिणामत: मूळ स्वरूपात असलेल्या विज्ञानविषयक संज्ञा या चल पदे म्हणून शैलीगत कार्य करू शकत नाहीत; तसेच या संज्ञांना संदर्भ-निकषांची पार्श्वभूमी लाभत नसल्यामुळे त्या कार्यशील होऊही शकत नाहीत.

विज्ञानविषयक लेखनाच्या शैलीचा विचार करताना नियतकालिक, वृत्तपत्र, स्वतंत्र ग्रंथ वगैरे माध्यमे, लेख, कथा, कादंबरी, ललितगद्य इत्यादी प्रकार, वाचकवर्गाची

निश्चिती, वाचकवर्गाच्या वैज्ञानिक साक्षरतेचा स्तर, यांवरून लेखनाचे स्वरूप निश्चित होते. वैचारिक लेखनाला लोकप्रियता मिळवून देण्यासाठी कहाणी, किस्से, सुरसता, चमत्कारिकता इत्यादी आविष्कारतऱ्हा आणि आविष्कृतांचा आधार घ्यावा लागतो. अवैज्ञानिक समाजाच्या निकषावर हे लेखन प्रबोधनपर कार्य पार पाडते. एकोणिसाव्या शतकातील लेखनाने हे कार्य पार पाडलेले दिसते. वरील सर्व संदर्भांचा मूल्यांच्या पातळीवरही विचार करावा लागतो.

विज्ञानाची प्रमाणित भाषा तयार झाल्यानंतर पारिभाषिक संज्ञांना अर्थाच्या दृष्टीने काटेकोर प्रतिशब्द तयार होतात. उदाहरणार्थ : फोर्स, एनर्जी, पॉवर या संज्ञांना 'शक्ती' हा एकच प्रतिशब्द वापरला जात असे. पुढे पॉवर या शब्दासाठी 'बळ' आणि आता 'कार्यत्वरा' हा प्रतिशब्द वापरला जातो. समाजातल्या इतरही घटकांचा संदर्भ लाभला तर या संज्ञांचा ऐतिहासिक भाषाविज्ञानाच्या आणि सामाजिक भाषाविज्ञानाच्या अंगांनी अभ्यास करता येईल. ज्या त्या समाजाची तात्कालिक वैज्ञानिक समजूत ही प्रमाणकासारखी किंवा संदर्भ-निकषासारखी कार्यशील असते. वैज्ञानिक वास्तविके ही या प्रमाणके अगर संदर्भ-निकषांच्या विरोधी जाऊन प्रमाणके अथवा संदर्भ-निकषांमध्ये बदल घडवून आणून समाजाचा वैज्ञानिक समजुतीचा स्तर उंचावू शकतात. परिभाषेपासून ते वाक्यरचनेपर्यंत अर्थस्तरावर वैज्ञानिक लेखन मुरण्यासाठी व त्याला शैलीगतता प्राप्त व्हावी यासाठी विविध सामाजिक क्षेत्रांतील संदर्भ-निकषांची फारच आवश्यकता आहे. विज्ञान, तंत्रज्ञानातील परिभाषा ही सर्वसामान्यांच्या नित्य वापरात असली, प्रमाण मराठी अगर बोलभाषेत वापरात असली तरी ती नि:संदर्भनिकषीय राहते, याला कारण विज्ञान-साक्षरतेचा अभाव हेच होय. कोणत्याही प्रकारच्या लेखनाच्या बाबतीत भाषा ही एका बाजूला तर शैली ही पलीकडच्या बाजूला असते. हे अंतर संदर्भ-निकषांनीच भरून काढावे लागते.

**संदर्भ :**


१. कुलकर्णी, कृ.भि. १९६५. 'पाठ्यपुस्तकांची भाषांतरे', समाविष्ट : **मराठी वाङ्मयाचा याचा इतिहास** खंड ४, संपा. रा.श्री. जोग, म.सा. परिषद, पुणे.

२. केळकर, अशोक रा. १९८३. 'परिभाषेची परिभाषा', समाविष्ट : **'वैखरी'** मॅजेस्टिक प्रकाशन, पुणे, पृ. १८४-८६.

३. नारळीकर, जयंत. १९९९ ( ४थी आवृत्ती ), **'विज्ञान आणि वैज्ञानिक',** श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पृ. ४२-४३.

४. नेमाडे, भालचंद्र. १९९०. **'दि इन्फ्लुअन्स ऑफ इंग्लिश ऑन मराठी',** राजहंस प्रकाशन, पणजी. पृ. १५२.



'कल्पकता', पीडीपीनगर, सटाणा : ४२३३०१ जि. नाशिक.

# एक परिषद : दोघांना अभिवादन

तीन संस्थांची स्थापना आणि प्रारंभिक संवर्धन यांच्याशी डॉ. अशोक रा. केळकरांचा जवळून संबंध आला. त्यापैकी भारतीय भाषा संस्थान (सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन लँग्विजिज) मैसूर या संस्थेने त्यांचा अलीकडे एका वेगळ्या प्रकारे सन्मान केला.

निमित्त होते एका आंतरराष्ट्रीय विद्वत्परिषदेचे, तिचा विषय होता साउथ एशियन लिंग्विस्टिक्स हा, आणि प्रसंग होता प्राध्यापक एमनो यांच्या वयाच्या शंभरीचा. २८ फेब्रुवारीचा १९०४ला कॅनडात जन्मलेले आणि १९७१ साली बर्कलीच्या कॅलिफोर्निया विद्यापीठातून निवृत्त झालेले मरी बार्न्सन एमनो अजूनही हिंडतेफिरते आहेत. त्यांचे भारतीय भाषांच्या वैज्ञानिक अभ्यासाच्या क्षेत्रात मानाचे स्थान आहे. लॅटिन आणि संस्कृत भाषा, भाषाविज्ञान, मानवसंस्कृतिविज्ञान, व लोकश्रुती (फोकलोअर) यांचा अभ्यास असलेले एमनो यांनी १९३५-३८ साली भारतात येऊन विविध आदिवासी भाषांची क्षेत्रीय पाहणी केली. त्यांची विशेष लक्षणीय कामगिरी म्हणजे द्राविड भाषाकुलाचा इतिहास आणि त्याला पायाभूत ठरणारा टॉमस बरो आणि एमनो यांनी मिळून सिद्ध केलेला तौलनिक द्राविड व्युत्पत्तिकोश (१९६१) आणि १९५६पासून ते मांडत असलेला भारत हे एक भाषाक्षेत्र असल्याचा विचार. (भिन्न कुलांतील भाषा एकाच भू-प्रदेशात दीर्घकाल नांदल्या तर त्यांच्यात आदानप्रदान आणि परस्परप्रभाव यामुळे प्रादेशिक साम्य उत्पन्न होऊ शकते. तसं ते भारतात झालेलं आहे.)

मैसूर मुक्कामी १ ते ४ जानेवारी २००५पर्यंत ही परिषद झाली.

डॉ. केळकर यांनी परिषदेचं औपचारिक उद्घाटन केले. नंतर त्यांच्या इंग्रजी भाषेतील विविध विषयांवरील लेखांचा संग्रह ई-पुस्तक रूपाने प्रकाशित करण्यात आला. हे पुस्तक कुणालाही एक विनामूल्य सेवा म्हणून पुढील संकेतस्थलावर उपलब्ध आहे :

<http://www.ciil-ebooks.net>

पुस्तकाचे शीर्षक आहे :

From a semiotic-humanistic point of view
Collected essays and studies
written and edited by Ashok R. Kelkar

परिषदेचे उद्घाटन करताना प्रा. अशोक रा. केळकरांनी केलेल्या भाषणाचा गोषवारा :

मी प्राध्यापक मरी बार्न्सन एमनो जन्मशताब्दीनिमित्त होणाऱ्या इंटरनॅशनल कॉन्फरन्स ऑन साउथ एशियन लिंग्विस्टिक्सचं उद्घाटन झाल्याचं जाहीर करतो.

मित्रहो, तुमच्या लक्षात आलंच असेल की माझ्या तोंडून आताच एक भाषिक कृती घडली. पण या कृतीचे वैशिष्ट्य म्हणजे त्या कृतीत भाषिक वचनाबरोबर दीपप्रज्वलनाचाही समावेश होता. म्हणजे हे उद्घाटन म्हणजे एका विधीची पूर्तता होती. नाही तरी दक्षिण एशियात आपण परिषद म्हणा, चर्चासत्र म्हणा यांच्याकडे हे विधि-नाट्याचे प्रकार असल्यासारखे पाहतो. नाट्याचे प्रकार अशासाठी म्हणायचे की ते उलगडत जातात, कुठून कुठे हे सांगता येत नाही, यातच तर नाट्याची गोडी असते. मात्र या नाट्यात रंगकर्मी आणि ते पाहायला-ऐकायला आलेले (भरताचार्यांच्या शब्दांत सांगायचं म्हणजे) 'सामाजिक' अशी स्पष्ट विभागणी नसते. आणि विधीचे प्रकार अशासाठी म्हणायचे की त्यांत एका अदृश्य फलाची अपेक्षा असते, त्यांतून 'अपूर्व-वस्तु-निर्माण' होत असते. मात्र कायकाय कृती कोणत्या क्रमाने करायच्या याची पक्की 'इतिकर्तव्यता' त्यात नसते. नाटकाचा मोकळेढाकळेपणा त्यांत असतो, ती एक क्रीडा किंवा 'प्ले'ही असते.

परिषदेचे उद्घाटन केल्यावर उद्घाटकाकडून आणखी एक विधी अपेक्षित असतो. त्याला अनुसरून उद्घाटन करायला माझ्यापेक्षा अधिक योग्य व्यक्ती नसती का मिळाली असं मी आता संयोजकांना विचारतो. माझी या प्रसंगीची अस्वस्थता मी आता बोलून दाखवणार आहे. तीन मुद्द्यांवरून मी अस्वस्थ आहे. ते क्रमाने सांगून माझ्यावरचं ओझं दूर करायचं मी ठरवलं आहे.

पहिली गोष्ट म्हणजे ज्यांच्या गौरवार्थ आपण इथे जमलो आहोत त्या प्राध्यापक एमनो यांच्याशी माझा संबंध फारच अल्प आला. त्यांचा शिष्य होण्याची माझी संधी थोडक्यात हुकली. मी कॉर्नेल विद्यापीठात डॉक्टरेट करत असताना १९५७ साली विदेशी विद्यार्थ्यांना, विद्यापीठाच्या नियमानुसार एक सत्र दुसऱ्या विद्यापीठात काढता येतं असं माझ्या लक्षात आलं. ते सत्र बर्क्लीला एमनो यांच्याजवळ काढण्याचा प्रस्ताव मी मांडला; पण काही कारणाने मला तिकडे न जाता येल विद्यापीठात जावं लागलं. त्यानंतर १९५९मध्ये कोयंबुतूरला भाषाविज्ञानासाठी समर स्कूल झालं त्या वेळी एमनो आणि मी प्राध्यापक म्हणून काम केलं आणि त्यामुळे त्यांच्या प्रत्यक्ष भेटीचा योग आला. त्या काळात भाषावैज्ञानिकांची जुनी पिढी ऐतिहासिक पद्धतीचा तर नवी पिढी वर्णनात्मक पद्धतीचा पुरस्कार करीत असे. ऐतिहासिक भाषाविज्ञान हा विषय एमनो

यांनी शिकवला. गंमत म्हणजे त्यांनी जुन्या पिढीतल्या विद्यार्थ्यांपेक्षा नव्या पिढीतल्या विद्यार्थ्यांना अधिक गुणश्रेणी दिली. विषयाचा आपल्या मांडणीतून त्यांनी भारतातल्या भाषेच्या अभ्यासकांना दाखवून दिलं की भाषाविज्ञान हा एकसंध विषय आहे आणि वर्णनात्मक विश्लेषणाकडे दुर्लक्ष करून आजची ऐतिहासिक पद्धती आत्मसात् करता येणार नाही. परिणामी या दोन पद्धतींमधली भारतातील निरर्थक चुरस थांबली. पुढे १९६८मध्ये एमनोंचे शिष्य प्राध्यापक भद्रिराजु कृष्णमूर्ति यांनी प्रस्ताव मांडला की आपण एमनो यांच्या गौरवार्थ एक षष्टिपूर्तिग्रंथ काढू. त्याच्यासाठी मी बोडो भाषेतील नात्याचे शब्द या विषयावर एक शोधनिबंध लिहिला. एमनो यांनी भारतातील दुर्लक्षित भाषांच्या अभ्यासाला आणि भाषा आणि समाजरचना यांचे संबंध तपासून पाहण्याला जी चालना दिली तिला मी या निबंधरूपाने अभिवादन केले. १९८४ साली बरो आणि एमनो यांच्या द्राविड व्युत्पत्तिकोशाची सुधारून वाढवलेली आवृत्ती निघाली आणि आजतागायत ती माझ्या अभ्यासिकेत हाताशी असते. दक्षिण आशियाई भाषाक्षेत्रात मराठी जरी इंडोएरियन भाषाकुलात मोडते तरी तिच्यावर द्राविड भाषांचा सखोल प्रभाव आहे याकडे मला दुर्लक्ष करता येत नाही. १९९५ साली महाराष्ट्र शासन पुरस्कृत विश्वकोशासाठी व्हिएतनामी भाषेवरची नोंद लिहिण्यासाठी मला विनंती करण्यात आली, आणि त्यासाठी एमनो यांनी त्या भाषेवर जे बेजोड काम केलेलं आहे ते माझ्या कामी आलं. एमनो यांना अभिवादन करताना मी त्यांचा 'अंतेवासी' नाही ही जाणीव मला या वेळी अस्वस्थ करीत आहे. (अंतेवासी म्हणजे जवळ राहणारा, शिष्य).

माझ्या अस्वस्थतेचं दुसरं कारण या परिषदेच्या विषयाशी निगडित आहे. 'साउथ एशियन लिंग्विस्टिक्स' या पदबंधनाचा दोन वेगळ्या तऱ्हेने विग्रह होऊ शकतो - दक्षिण आशियातील भाषांचा अभ्यास आणि भाषांचा दक्षिण आशियातील अभ्यास. दक्षिण आशिया हे भाषेच्या वैज्ञानिक विश्लेषणांचं उगमस्थान आहे. नुसतं पेशावरजवळच्या पाणिनीच्या अष्टाध्यायीच्या रूपाचे उगमस्थान नाही, आणखी काही. उगीच नाही प्राध्यापक रोमान याकोबसन एका व्याख्यानात म्हणाले : अमुक एक विचार वा कल्पना प्रथम मांडणारा अमकातमका म्हणून एखाद्या पाश्चात्य अभ्यासकाचं नाव घेण्याअगोदर एकदा भारतीय परंपरेचा धांडोळा घेतलेला बरा. न जाणो, कुणा भारतीयाने काही शतकं अगोदर तो विचार वा कल्पना मांडलेली असायची ! एवढंच नव्हे तर हा प्रदेश म्हणजे विविध कुळांतल्या आणि काळांतल्या भाषांचं जणू एक संग्रहालयच आहे. माझ्यासारख्या भाषावैज्ञानिकाला याहून चांगली पार्श्वभूमी कोणती लाभू शकेल ? मी काहीशा अभिमानानं सांगू शकतो की मी मराठी, हिंदी, भारतीय

इंग्रजी या तीन दक्षिण आशियाई भाषांत माझ्या विषयात लेखन-भाषण करू शकतो. मी जरी मराठी, हिंदी, काश्मीरी, वा बोडो यासांरख्या दक्षिण आशियाई आणि इंग्लिश, फ्रेंच, वा काही उत्तर-पूर्व अमेरिकेतील अल्गाँक्वियन भाषा यांसारख्या दक्षिण आशियाच्या बाहेरच्या भाषांवर काम केलेलं असलं तरी मला या दोन्ही उद्योगांत काही फरक जाणवला नाही. यूरोपीय आणि अमेरिकी मंडळी आपल्या भाषांवर सहजपणे काम करतात, तर आपल्याला बिगर दक्षिण-आशियाई भाषांवर काम करायची बुद्धी का बरं होऊ नये ? अगदी दक्षिण आशियाई भाषांची गोष्ट घेतली तरी स्वभाषेच्या, फार तर तिच्या वर्तुळाच्या पलीकडे जायला आपण बुजतो की काय ? तक्रार तशी जुनीच आहे. महाभारताच्या भांडारकर आवृत्तीचे आद्य संपादक विष्णु सखाराम सुकथनकर दहाव्या अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदेच्या व्यासपीठावरून १९४० साली म्हणाले होते की ''आमच्या पिढीतली मंडळी इतकी कर्मठ आहेत की आपल्या खास, पवित्र भाषांपद्धतीच्या बाहेरच्या एखाद्या भाषेचा अभ्यास करावा असे त्यांना वाटत नाही.'' हिंदू अरबी-फार्सीकडे ढुंकून बघणार नाहीत की मुस्लिम संस्कृत-प्राकृतकडे; इंडोएरियन-भाषक द्राविडभाषांकडे की द्राविडभाषक इंडोएरियन भाषांकडे, इत्यादी इत्यादी. ह्या नियमाला कोयंबुत्तूरला ज्यांचा मला शोध लागला ते माझे विद्यार्थी दर्भे नारायण शंकर भटांसारखे सन्माननीय अपवाद आहेत, पण फार थोडे. आज आपण निवासी आणि अनिवासी भारतीय नववर्षाचा संकल्प करू या की ही अस्वस्थ करणारी स्थिती आपण इथून पुढे पालटू. हे झालं दक्षिणआशियाई भाषांच्या अभ्यासाबद्दल.

भारतीय, पाकिस्तानी, बांग्लादेशी, नेपाळी, भूटानी, आणि श्रीलंकीय अभ्यासकांनी एकमेकांशी असलेले संपर्क अजून कितीतरी वाढवायला पाहिजेत. आज हळूहळू ज्ञानाचं जागतिकीकरण व्हायला लागलं आहे, पण आपल्या अभ्यासकांना खऱ्या जागतिकीकरणाची चाहूल लागलेली दिसत नाही. त्यांच्या ज्ञानाच्या जागतिकीकरणाच्या कल्पना या किंवा त्या अशा दोन विपरीत टोकांकडे जातांना दिसतात. बऱ्याच जणांना वाटतं की आपण पश्चिमेकडे आजच्या घटकेला काय होतंय ते जाणून घेऊन त्याचं अनुसरण केलं की गंगेत घोडे न्हायले. काही थोड्यांना धन्यता वाटते की आपण आपल्या पूर्वजांनी काय म्हटलंय त्याचं अनुसरण करायचं आहे- मग ती परंपरा पाणिनीपासूनची असो की तोलकाप्पियम्-काराची असो की अरबी-फार्सी वैयाकरणांची असो. कुठल्याही टोकाकडे धावलं तरी आपण पराधीनच राहणार. आजच्या दक्षिण आशियाई अभ्यासकांना पूर्वेचे आणि पश्चिमेचा असे वारसे आयते लाभलेले आहेत त्यांचा नीट धांडोळा घेऊन आपल्या ज्ञानात भर घालून नंतर जगाच्या

ज्ञानात आपली म्हणून काही नवी भर टाकायला आपण कधी उद्युक्त होणार की नाही ? असं करताना आपल्याला आणखी एक संधी आहे. भाषेचा अभ्यास आणि साहित्यादि मानव्यविद्यांचा अभ्यास यांचे पूर्वी निकट साहचर्य होतं आणि ते उभयतांना उपकारक होतं. प्राध्यापक रोमान याकोबसन तर एकदा म्हणाले : काव्याच्या भाषेचा विचार केल्याशिवाय भाषेच्या सर्जकतेचा विचार पुरा होऊच शकत नाही; सर्जकता वेगळी आणि चॉम्स्की म्हणतो ती भाषेची उत्पादकता वेगळी. आज मात्र पाश्चात्यांनी हे साहचर्य टाकून दिलेलं दिसतं. साहित्याच्या अभ्यासकांना तुम्ही आपली मुलगी कधी तरी भाषावैज्ञानिकाला द्याल का असा बाष्कळ प्रश्न एफ्.डब्ल्यू. बेटसन विचारतात आणि उलट बरेच भाषावैज्ञानिक साहित्याकडे नजरही टाकत नाहीत. आपण ही दुरवस्था दूर करण्याऐवजी त्यांच्या त्यांच्या अडाणीपणाचं अनुसरण करत आहोत. अमेरिकीकरणालाच जागतिकीकरण समजायचं हे बस् झालं ! हेकट स्वदेशी-आग्रहालाच खरं स्वराज्य समजणं हाही अडाणीपणा बस् झाला !

माझ्या अस्वस्थतेच्या तिसऱ्या आणि शेवटच्या कारणाचा मी आता उच्चार करणार आहे. आज म्हणे माझ्या कलेक्टेड पेपर्सचा संग्रह प्रकाशित होणार आहे. पाणिनीय व्याकरणपरंपरेत दोन प्रकारचे गण मानले आहेत - पुरी यादी देऊन मोकळे होणारे संपूर्ण गण आणि 'इत्यादी' म्हणून मोकळे होणारे आकृतिगण. कलेक्टेड पेपर्स म्हटलं की मला आपली जुन्या पद्धतीच्या टंकयंत्रात ओळीच्या शेवटाअगोदर वाजणारी शालीन घंटी आठवते. मंडळी हो, माझं ई-पुस्तक हा आपला आकृतिगणच आहे असं मी समजतो. आता या घटकेला पुण्याला माझ्या अभ्यासिकेत दोन लेखांची सुरुवात होऊन पडली आहे - एक फ्रेंच भाषेतील इन्टोनेशनबद्दल आणि दुसरा भाषिक, सामाजिक, आणि सांस्कृतिक आकृतिबंधातल्या काही साम्यांबद्दल.

माझ्या मनातल्या त्रिविध अस्वस्थतेला याप्रमाणे वाट करून दिल्यानंतर मला आता मोकळं वाटतं आहे. हे उद्घाटित केलेले विधि-नाट्य आपणा सर्वांना आनंददायी आणि फलप्रद होवो अशी इच्छा मी प्रकट करतो. म्हटलं आहे ना -

सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै ।
तेजस्विनावधीतमस्तु । मा विद्विषावहै । ■

**उंदरांचे भाषाज्ञान**

डच आणि जपानी भाषांमधील फरक ओळखण्यासाठी उंदीर मानवी भाषेच्या लयींचा उपयोग करू शकतात असे स्पेनमधील संशोधकांना आढळले आहे. भाषेचा उपयोग व भाषेचा विकास यांच्या मुळाशी असलेली काही कौशल्ये भाषा विकसित होण्यापूर्वीच प्राण्यांमध्ये- विशेषतः सस्तन प्राण्यांमध्ये - विकसित झाली असावीत असे आपल्या संशोधनातून सूचित होते, असा या संशोधकांचा दावा आहे. इंडियन एक्स्प्रेस, ११-१-२००५

# अहिराणी बोलीचा भाषावैज्ञानिक अभ्यास

विद्यागौरी टिळक

(परीक्षित ग्रंथ - 'अहिराणी भाषा-वैज्ञानिक अभ्यास', प्रा. डॉ. रमेश सूर्यवंशी, अक्षय प्रकाशन, पुणे ३०, ऑक्टो. १९९७, पृ. १६०, मूल्य रु. १२०/-)

महाराष्ट्रात आधुनिक भाषाविज्ञानाचे महाविद्यालयीन स्तरावर अध्यापन सुरू होऊन जवळपास दोन दशके होत आलेली असताना, मराठी भाषेचे विविध प्रकारांनी केलेले अभ्यास तुरळक का होईना, पुढे येऊ लागले आहेत. डॉ. रमेश सूर्यवंशी यांनी (बहुधा प्रबंध-लेखनानिमित्त) अहिराणी बोलीचा केलेला अभ्यास हा यापैकीच एक आहे. अशा रीतीने बोलीभाषांचे विश्लेषण व्हावे, ग्रंथरूपाने प्रसिद्ध व्हावे, ही स्वागतार्हच गोष्ट आहे. परंतु या अभ्यासांमधून आवश्यक तेवढी शिस्त व पद्धतशीरपणा बरेचदा नसतो, ते या पुस्तकाबाबतीतही खेदाने नोंदवावे लागते.

अहिराणी बोलीचे स्वरूप लक्षात यावे, यासाठी प्रास्ताविकात विस्ताराने ऐतिहासिक, भौगोलिक व सामाजिक तपशील देऊन स्पष्टीकरण केलेले आहे. सर्वसामान्य जनता एकाच बोलीसाठी अहिराणी-खानदेशी ही नावे वापरत असली, तरी वस्तुतः खानदेशी हे अहिराणीने काळाच्या ओघात हळूहळू धारण केलेले विशाल रूप आहे. त्यामुळे आज अहिराणी हा खानदेशीचा एक सामाजिक प्रभेद ठरतो, अशी लेखकाची भूमिका आहे. तिच्या पुष्ट्यर्थ अन्य प्रादेशिक व सामाजिक प्रभेदांचा निर्देश आलेला आहे. यासंदर्भात सविस्तर विवेचन नसले, तरी एकूण भूमिका पटण्याजोगी वाटते. या मांडणीत काही ठिकाणी पुनरुक्ती व विस्कळीतपणाचा दोष मात्र जाणवत राहतो.

दुसऱ्या प्रकरणापासून पुढे अहिराणीचे प्रत्यक्ष भाषावैज्ञानिक विवेचन येते. स्वनविचार, रूपिमविचार, वाक्यविचार, अर्थविचार या चारही स्तरांसोबतच अन्य भाषांच्या प्रभावाबद्दलच्या विवेचनाचाही त्यात अंतर्भाव आहे. लेखकाने अहिराणी बोलीचे प्रत्यक्ष क्षेत्रीय संशोधन केलेले आहे, हे पटण्याजोगी पुष्कळ उदाहरणे त्यामध्ये येतात. अहिराणीच्या स्वरूपाविषयीही काहीएक बोध होतो.





अनुक्रमणिका

या अभ्यासाला व एकूण केलेल्या मांडणीला आधुनिक भाषाविज्ञानाची मात्र चौकट नीटपणे प्राप्त झालेली नाही. तशी ती झाली असती तर हा अभ्यास निश्चितपणे अधिक उपयुक्त ठरला असता, असे मात्र म्हणावेसे वाटते.

यासंबंधीचा गोंधळ भाषेच्या वेगवेगळ्या स्तरांसंबंधी लिहिताना झालेला आहे. 'स्वनविचार' या दुसऱ्या प्रकरणामधे 'लांब शब्दांच्या बाबतीत असे दिसून येते की त्यातील अंत्य अवयव हे ऱ्हस्व होत जातात. असे असले तरी मराठी लेखनातील परंपरेला अनुसरून शब्दांतीच्या 'इ' आणि 'उ' या स्वरांचे उच्चारण ई आणि ऊ असे सर्वत्र लेखांकित केले आहे. यामध्ये शास्त्रीयतेपेक्षा व्यवहारसौकर्याला प्राधान्य देण्यात आले आहे.' (पृ.१५) असे लेखक नोंदवतो. 'भाषावैज्ञानिक' विवेचनामध्ये व्यवहारसौकर्याला प्राधान्य कशासाठी ? येथे शास्त्रीय कर्मठपणा सांभाळावाच. त्याअभावी अहिराणी बोलीतल्या शब्दांचे यथायोग्य उच्चारण वाचकांपर्यंत पोचणार कसे ? स्वनविचारामध्ये पुष्कळशी व्यंजने पाय मोडून आलेली दिसतात. त्यामुळे उच्चारानुसारी लेखन असावे, असा ग्रह होतो आणि त्याचवेळी उपरोक्त विधानामुळे संशयही वाटत राहतो.

स्वनिमांचे वर्णन देताना काही ठिकाणी केलेले पद्धतीचे अनुसरण अनाठायी आणि अयोग्यही वाटण्याजोगे आहे. उदा० जवळच्या व्यंजनस्वनिमांतील व्यतिरेक आवश्यक तेथे लघुतमांतर युग्मे देऊन सिद्ध करावा, हे उचित आहे. त्यामुळे घोष-अघोष, अल्पप्राण-महाप्राण  वा स्थानभेद असणाऱ्या जोड्या तपासाव्याच लागणार. परंतु / क / - / श / या स्पर्श-संघर्षी आणि स्थानभेद दर्शवणाऱ्या जोड्यांचे वेगळेपण पद्धत म्हणून सिद्ध करीत बसण्याचे प्रयोजन नाही. 'काया'-'शाया', 'भाकर'-'साकर' अशांना काटेकोरपणे पाहता लघुतमांतर युग्मेही म्हणता येणार नाही. परंतु या रीतीने सर्व व्यंजनस्वनिमांच्या संभाव्य जोड्यांबाबत विवेचन येते.

पारिभाषिक संज्ञांच्या वापराविषयी सर्वाधिक गोंधळ रूपिमांसंबंधीच्या प्रकरणांमधे दिसतो. 'रूपिम' ही संज्ञा 'लघुतम सार्थ घटक' या अर्थाने भाषाविज्ञानात स्वीकारलेली असताना त्यांचे साधे, संयुक्त, साधित वा घटित, अभ्यस्त असे प्रकार कसे काय होऊ शकतात ? शब्द/पदघटनेच्या प्रक्रिया पुढील विवेचनात व्यवस्थितपणे येतात, मात्र 'रूपिम' म्हणून जिथे जिथे विवेचन आहे, तेथे गोंधळ निर्माण झालेला दिसतो. पारंपरिक व्याकरणातील संज्ञाही त्याच अर्थाने येतात, असे नाही. उदा० साधित शब्दांचे विवेचन करताना 'विकारांग' ही संज्ञा 'धातू' याच अर्थाने आलेली दिसते.

आधुनिक व पारंपरिक परिभाषेबद्दलच्या या संभ्रमात काही चुकीच्या संज्ञाही आलेल्या दिसतात. उदा० 'वचनांचा विचार करता एकवचनी नामे, बहुवचनी नामे

वचनभेदनिरास असे नामांचे तीन गट पडतात.' (पृ.७८), पृ. ८१वर 'वचननिरास' असे नाव दिलेल्या स्तंभात 'कडबा'सारखे नाम येते. वस्तुत: अशी नामे वचनविरहीत नसतात, तर एकाच विशिष्ट वचनात वापरली जातात, असे म्हटले पाहिजे.

भाषेच्या सर्व स्तरांचा विचार करायचा, असा दृष्टिकोण ठेवल्यामुळे वाक्यस्तरावरील 'प्रयोगां'चा विचार क्रियापदांना जोडून थोडक्यात येऊन जातो. त्यातच सर्व काळ व अर्थांच्या वापराचीही उदाहरणे येतात. मात्र सुरावलीसारखा अतिरिक्त संघटक अहिराणीत प्रमाणभाषेसारखाच येतो की निराळा, अशासारख्या मुद्यांकडे लक्ष गेल्याचे दिसत नाही.

अर्थविचारामध्ये मुख्यत्वे अर्थक्षेत्रे व सरूपता, अनेकार्थता, समानार्थता इ० असलेले शब्द याबाबतचे विवेचन पुरेसे ठरले असते. अर्थप्रकार, अर्थ-अर्थ संबंध, अर्थपरिवर्तनाचे प्रकार याबाबतीत अहिराणीची म्हणून निराळी वैशिष्ट्ये असण्याचे कारण नाही. तरीही हे मुद्दे चर्चेला घेऊन अहिराणीतली मराठीला समांतर अशीच उदाहरणे दिलेली दिसतात.

अखेरचे अन्य भाषांचा प्रभाव स्पष्ट करणारे प्रकरण अहिराणीच्या शब्दसंग्रहाची कल्पना देणारे आहे; परंतु एकूण अभ्यास वर्णनात्मक स्वरूपाचा म्हटल्यावर अशा ऐतिहासिक चर्चेची गरज काय ? हा प्रश्न उपस्थित होऊ शकतो.

पुस्तकाची एकूण मांडणी व छपाई यांच्याबाबतीतही अनेक त्रुटी जाणवतात. प्रत्यक्ष विवेचन आणि पुढे उदाहरणासाठी दिलेले तक्ते यांच्यात मेळ नसणे (पृ. ९६-९७), अनुक्रमणिकेतील प्रकरणे व प्रत्यक्षातील प्रकरणे यांच्यात संगती नसणे या त्यातील काही ठळक जाणवणाऱ्या बाबी.

भाषावैज्ञानिक अभ्यास अधिकाधिक प्रसिद्ध व्हायला हवेत, ही गोष्ट खरी असली, तरी प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांतून वाचकांना ज्ञानप्राप्तीचा निखळ आनंदही मिळायला हवा. खाचखळग्यांमधून मार्ग शोधण्याची वेळ त्याच्यावर येता कामा नये.

सदर पुस्तकातून अहिराणी बोलीविषयीच्या ज्ञानासोबतच मिळणारा हा इशाराही ध्यानात ठेवण्याजोगा आहे. ■

> उदाहरणार्थ समजा, दोन मराठी भाषी नेत्रतज्ज्ञांची भेट झालीय आणि त्यांतल्या एकाला त्याने त्या दिवशी केलेल्या शस्त्रक्रियेबद्दल दुसऱ्याला सांगायचं आहे तर ते त्याला संपूर्णपणे मराठीत सांगणं शक्य होईल काय ? हे होत नाही तोपर्यंत मराठी किंवा त्या दृष्टीने पाहिल्यास सर्वच भारतीय भाषा पूर्णपणे विकसित आहेत असं म्हणणं कठीण आहे.
>
> **डॉ. प्रमोद तलगेरी,** वाङ्मय वृत्त जुलै, २००३





अनुक्रमणिका

पुस्तक-परीक्षण

# उपयुक्त संकलन

जयश्री पाटणकर

[परीक्षित पुस्तक - मराठी भाषा सौष्ठव, म्हणी-अलंकार, वाक्‌प्रचार - वसंत भ. उत्पात स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे २००३, किंमत रु. १५०/- ]

कोणत्याही भाषेचे सौष्ठव तिच्यातील म्हणी व वाक्‌प्रचारांच्या नेमक्या व लक्ष्यवेधी वापरावर अवलंबून असते हे सगळ्यांना माहीत आहे. पण हे कौशल्य आत्मसात करण्यासाठी अशा साहित्याचे केलेले वाचन जसे उपयोगी पडते तसे काही अंशी त्यांच्या (म्हणी, वाक्‌प्रचारांच्या) संकलनांचीही मदत होत असते. श्री. वसंत उत्पात यांचे पुस्तक याच स्वरूपाचे आहे. वक्त्याला सभेत छाप पाडण्यासाठी, निबंधलेखकांना निबंध आकर्षक करण्यासाठी, व्यक्तींना आपला ठसा चारचौघांत उमटविण्यासाठी, मुलाखत प्रभावी होण्यासाठी, तसेच शिक्षक, राजकारणी, कीर्तन-प्रवचनकार, नट-नट्या या सर्वांनाच अशा सूत्रसाहित्याची गरज असते. वसंत उत्पात स्वत: मराठी व इतिहासाचे शिक्षक असल्याने ते आपल्या अध्यापनात या सर्वांचा सातत्याने उपयोग करीतच होते. परंतु नव्या पिढीला या संचित धनाची माहिती देण्याच्या हेतूनेच त्यांनी हे पुस्तक लिहिले आहे.

या पुस्तकात म्हणी, वाक्‌प्रचारांबरोबर, सांप्रदायिक (पारंपरिक) उपमा-रूपके (उदा० एरंडासारखा उंच, कुंभकर्णासारखा झोपाळू, बगळा - बाहेरून साधा, आतून कपटी, गोगलगाय - निरुपद्रवी प्राणी इ०), पुराणवाङ्मयातून झिरपत आलेले कल्प (सूत्ररूप शब्द), (उदा० जडभरत, त्रिशंकू, शिराळशेट इ०) वापरात असलेले न्याय (दृष्टान्त), (उदा० = कूपमंडूक न्याय, काकतालीय न्याय इ०), प्रहेलिका, उखाणे, कूटे, देशोदेशीच्या म्हणी, मराठीला समानार्थी अशा इंग्रजी म्हणी - यांचा संग्रह केलेला आहे. पण हा निव्वळ सूत्रवचनांचा संग्रह नाही; कोश नाही. यात प्रत्येक वाक्योक्तीचा अर्थ, त्यामागील कथा, पारिभाषिक संज्ञांचे स्पष्टीकरण, समकालातील अर्थ इ० असून त्याचा वाक्यातही उपयोग करून दाखविलेला आहे. उदाहरणार्थ, 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' - या म्हणीचा उगम तांड्या ब्राह्मण-ग्रंथात आढळतो.





अनुक्रमणिका

या संदर्भातील वाग्देवीची कथा येथे अर्थ स्पष्ट करण्यासाठी दिलेली आहे. 'त्रिशंकू'ची कथा दिली आहे. चौदा देशांतील म्हणींचे थोडक्यात संकलन करतानाही परिश्रम केल्याचे जाणवते. प्रहेलिकांचा इतिहास, व्याख्या व उपयोगाच्या जागा साहित्यशास्त्रकारांना पुसत सांगितल्या आहेत. उदाहरणार्थ ब्रह्मोद्यांचे स्पष्टीकरण करताना ऋग्वेद, यजुर्वेदातील संवादात्मक उदाहरण देऊन सूत्रवचनांच्या आविष्कारांचे प्राचीन रूप स्पष्ट केले आहे. तसेच 'महापुरे झाडे जाती... (तुकाराम), 'धटासी आणावा धट' (रामदास) अशा संतवचनांतील व्यापक अर्थ 'वाक्‌प्रयोग' या संदर्भातही घ्यायला कसा हरकत नाही ते सांगितले आहे. अशाप्रकारे उत्पात यांच्याजवळ या सर्व संदर्भात विपुल माहिती आहे हे जाणवते व ते सोप्या भाषेत व्यक्त करण्याची त्याची हातोटी लक्षात येते. यामुळे सामान्य वाचकांच्या ज्ञानात निश्चितच भर पडेल असा विश्वास वाटतो.

पण अभ्यासकाच्या दृष्टीने या पुस्तकाच्या मांडणीत अनेक बदल करणे गरजेचे आहे.

(१) पुस्तकात तेरा भागांत संकलित केलेली माहिती व तिचे वर्गीकरण यामागील निकष निश्चित करावा. म्हणजे, आपण म्हणी, वाक्‌प्रचारांचा संग्रह कोश करीत आहोत का वर्णनात्मक कोश करीत आहोत, हे निश्चित करावे. म्हण, वाक्‌प्रचार, उखाणे, कल्पशब्द, संतवचने हे सारे एकच मानावयाचे असेल तर त्यासाठी लोकोक्ती अशी संज्ञा वापरून त्या सर्वांचा एकत्रित संग्रह करावा. नाहीतर प्रत्येक संकल्पना एकमेकीपासून कोणत्या अर्थाने भिन्न आहे, तिची व्यवच्छेदक वैशिष्ट्ये कोणती, ते नीट स्पष्ट करावे.

(२) सर्व संकलित सामुग्रीची मांडणी अकारविल्हे होणे अत्यंत गरजेचे आहे. पृ. १०८, १३२, १८० अशा अनेक ठिकाणी वर्णक्रम पाळलेला नाही; संख्याक्रमही नाही.

(३) लेखकाने संग्रह करताना एकावेळी एकच हेतू मनात ठेवावा. एकापेक्षा अनेक हेतूंसाठी संकलन करावयाचे असेल तर माहितीला 'जंत्री'चे स्वरूप येऊ न देता योग्य त्या कारणासाठी, योग्य ती माहिती, योग्य त्या ठिकाणीच मिळेल अशी रचना, अशी दर्शकचिन्हे, संक्षेपचिन्हे वापरण्याची गरज आहे.

(४) अनेक ठिकाणच्या माहितीची अनाठायी नोंद हीही खटकणारी गोष्ट आहे. उदाहरणार्थ, पृ.१८८-८९वर 'गणेशविद्ये'बद्दल दिलेली माहिती, अनाठायी असून ती 'संतवचनातील म्हणी' या प्रकरणात दिली आहे. 'संस्कृतमधून आलेले वाक्‌प्रचार' सांगताना (पृ. ७५) संस्कृत व प्राकृत भाषांचा वंशवृक्ष दिलेला आहे. पृ.१११वर

मित्राच्या मुलाला सांख्यिकी अभिवृत्ती नसूनही मित्राने मुलावर जे दडपण आणले त्याची गोष्ट दिली असून ती अनाठायी आहे.

(५) लेखकाने स्वत:जवळ असलेल्या माहितीचे नीट वर्गीकरण करणे गरजेचे आहे. उदाहरणार्थ पहिल्याच प्रकरणात म्हणींचे स्वरूप स्पष्ट करताना तिच्या व्याख्या, स्वरूप, पौर्वात्य पाश्चात्य परंपरा व त्यांची भूमिका मांडत असताना, म्हणींचा उपयोग (पृ. ७३), म्हणींतील अनुभवांचे स्वरूप (पृ. ६९), म्हणीतील सौंदर्य (पृ. ७१), आदर्श म्हणीचे विशेष (६९), म्हणींचे वर्गीकरण (पृ. ६७) हे विवेचन तार्किक व तात्विक दृष्टीने पहिल्याच प्रकरणात येणे गरजेचे होते. पण ते अन्य प्रकरणात घुसखोरी करते. यामुळे अभ्यासकाचा गोंधळ होतो.

(६) पुस्तकाचे स्वरूप वस्तुनिष्ठ काटेकोर मांडणीचे असावे, अशी अपेक्षा असताना अनेक ठिकाणी व्यक्तिगत संदर्भ (पृ. १११, ८९ इ०) चुकीच्या पारिभाषिक संज्ञांचा वापर (उदा० - अर्थसंकोच पृ. ७३, आदर्श अलंकृत म्हण - ७१, कल्पशब्द - १११), काटेकोरपणाचा अभाव व अनाठायी पाल्हाळ यामुळे पुस्तकाचे स्वरूप कडबोळ्याप्रमाणे झाले आहे.

व्याकरण हे सूक्तिवाङ्मय नाही. ते लिहिल्या व बोलल्या जाणाऱ्या भाषेची व्यवस्था लावते व सूत्र/सूक्तिवाङ्मय भाषेत सौंदर्य आणते. तेव्हा त्यांची एकत्रित मांडणी योग्य नव्हे. एकत्रितच करावयाची असेल तर त्यांचा तार्किक अनुबंध, व्याप्य-व्यापक संबंध स्पष्ट करण्याची गरज आहे.

दुसरे असे की, कोशरचनेचे एक शास्त्र/पद्धत असते. त्यात 'ऐतिहासिक व्याकरणाची वाटचाल' (तीही फक्त १९६०पर्यंतची) दिली आहे. असा वर्णनपर, स्थूल आढावा घेणारा निबंध कोशात समाविष्ट होऊ शकत नाही.

■

### ज्याची त्याची अर्थप्रतीती

''त्यांना सौंसार की काय तो नसणार सोड्.'' चंब्या कुलकर्णी चारदा तरी म्हणालेला

''सौंसार म्हणजे काय ते ?'' असं गंग्यानं त्याला विचारलं तेव्हा तो म्हणालेला,

''सौंसार ? म्हणजे ? तांदूळ, गूळ, पीठ, भांडी, बादली, नौरा, हे, ते. शिवाय आणि आपल्यासारखी पोरं.''

**प्रकाश नारायण संत**, 'झुंबर', मौज, दिवाळी १९९५.

प्रेषक : **डॉ. अशोक रा. केळकर**, पुणे.

# शिक्षकांसाठी मराठी व्याकरण

जयश्री पाटणकर

[ परीक्षित पुस्तक : 'तुमचे आमचे मराठी व्याकरण' - श्रीपाद भागवत. विद्याभारती प्रकाशन, लातूर, २००३, पृष्ठे ४९१, किंमत रु. ९०/- ]

'तुमचे आमचे मराठी व्याकरण' हे श्रीपाद भागवत यांचे, चाळीस वर्षांच्या मराठी-व्याकरणाच्या अध्यापनानुभवातून आकाराला आलेले, शालेय व कनिष्ठ महाविद्यालयीन विद्यार्थी व शिक्षकांसाठी लिहिलेले पुस्तक आहे. भाषा व वर्णाक्षर विचारापासून छंद, वृत्त, निबंध, पाठ्येतर गद्य-पद्याचे आकलन, संवादकौशल्य, मुलाखत, कार्यालयीन पत्रे, वृत्तांत, भाषांतर अशा एकूण २६ विषयांवर, नियम, पोटनियम व त्यातील सर्व बारकावे सूचित करणारे असे हे दिशादर्शक लेखन आहे. प्रत्येक पाठाच्या सुरुवातीला दिलेली माहिती शिक्षकांना अतिशय उपयुक्त असून त्यायोगे विद्यार्थ्यांना अगदी सहजपणे विषयापर्यंत नेता येईल. उदाहरणार्थ, 'संधी'च्या पाठात, एक वाक्य देऊन त्यातील अक्षरे उच्चारताना, ती एकमेकात कशी मिसळलेली आहेत ते सांगून, 'एकत्रित वर्णोच्चार' म्हणजे संधी - अशी संकल्पना स्पष्ट केली आहे. 'शब्दसिद्धी'च्या पाठात, प्रथम व्यवहारातील साधा संवाद देऊन, त्यात किती शब्द परकीय आहेत, ते ओळखावयास लावून तत्सम, तद्‌भव शब्दांकडे नेले आहे.

हे पुस्तक शालेय अभ्यासक्रमाशी (इ. १२वीपर्यंत) निगडित असूनही केवळ अभ्यास घटकांचे विवरण असे त्याचे स्वरूप नसून समकालीन प्रचलित भाषिक व्यवहाराचेही निरीक्षण त्याच्यात नोंदविलेले आहे. उदाहरणार्थ, 'नाम' या शब्दजातीच्या विवेचनात मुख्य प्रकारांबरोबर व्यवहारात सामान्यनामाचा विशेषनामासारखा उपयोग कसा होतो ('पुरीला रथयात्रेचा उत्सव असतो') कधीकधी धातुसाधितेही नामासारखी कशी वापरात आहेत ('राष्ट्रीय महामार्गावर वाहनांची जा-ये जोरात असते') एकाक्षरांचाही ('ॐ', 'श्री') नामासारखा कसा वापर केला जातो ते उदाहरणे देऊन स्पष्ट केले आहे. यामुळे व्याकरण दैनंदिन अनुभवांच्या निकट आल्यासारखे वाटते. विद्यार्थी व शिक्षकवर्गात व्याकरणविषयक असलेली भीती येथील

भाषेमुळे व मांडणीमुळे दूर होऊ शकेल. निबंधादी लेखनकौशल्यप्रकारांतही प्रश्नोत्तरमाध्यमातून जिज्ञासा जागृत करून विद्यार्थ्यांना लिहिते केले आहे. एकाच विषयावर निबंध, संवाद, मुलाखत, कल्पनाविस्तार अशा वेगवेगळ्या प्रकारांत लेखन करताना कोणते व कसे फरक करावेत, ते सोदाहरण स्पष्ट केले आहे. तसेच प्रत्येक पाठाला विस्तृत, जिज्ञासेला खतपाणी घालणारे, सराव केल्यास संकल्पना रुजविणारे स्वाध्याय आहेत. या स्वाध्यायातूनही समृद्ध भाषिक संस्कृतीचे दर्शन घडते. विशेष म्हणजे, विषयाशी संबंधित अनेक समकालीन शंकांना उत्तरे देण्याचा प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ, पृ. ५१ वर 'संधी' प्रकरणात 'अंत:संधी'चा विचार (संस्कृतला अनुसरून) मांडतांना 'न' चा 'ण' केव्हा होतो या शंकेलाही उत्तर दिले आहे; ते असे - 'संस्कृत भाषेच्या ध्वनिनियमानुसार एकाच शब्दात 'ऋ', 'र्' किंवा 'ष्' आणि 'न्' यांच्या मध्ये स्वर - य्, व्, ह्, क-वर्ग, व प-वर्ग यांच्यामधील वर्ण आला तर 'न'चा 'ण' होतो (उदा० नारायण, दूषण इ०) मात्र याखेरीज इतर वर्गांतील ('च' वर्ग, 'ट' वर्ग, 'त' वर्ग यांतील) शब्दाच्या वा प्रत्ययाच्या अंती येणाऱ्या 'न' चा 'ण' होत नाही (उदा० वेष्टन, समर्थन इ०). वाक्यविचारात विभक्तीचा कारक संबंध सांगून शालेय विद्यार्थ्यांचे काम भागले असते. पण व्यवहारात वापरल्या जाणाऱ्या काही पदबंधांत, उदा० रुपयाला पेरू, चंद्राहून शीतल, - अशा पदबंधांत दिसणारा संबंध हा कारक नसून उपपदसंबंध आहे हे स्पष्ट केले आहे - ही विशेष माहिती विद्यार्थ्यांना व्याकरणाकडे डोळसपणे पाह्यला शिकविते. (अशा संबंधाला कारक म्हणता येत नाही; कारण त्यांचा संबंध वाक्यातल्या क्रियापदाशी नसतो, तो फक्त अन्य पदांशी असतो.) असेच बारकावे कार्यालयीन लेखनातही कसे लक्षात घ्यावे लागतात ते स्पष्ट केले आहे. यासाठी आधी रोजच्या व्यवहारातील दाखले दिले आहेत. उदाहरणार्थ, अलीकडे घरातल्या घरातच व्यक्तींना निरोप लिहून ठेवावे लागतात. त्यात वेळ, नेमकेपणा, उलगडेल असा संदर्भ स्पष्ट केलेला नसेल तर गोंधळ उडतो - हे लक्षात आणून देऊन पत्रलेखनातील तंत्राचे महत्त्व स्पष्ट केले आहे.

मात्र लेखकाने मनाशी अनेक हेतू ठेवल्यामुळे (स्वत:च्या अभ्यासाचे प्रदर्शन, शिक्षकांना माहिती देण्याची हौस, विद्यार्थ्यांशी जवळीक, समकालाचे भान व्यक्त करण्यातील चटपटीतपणा इ०) अनाठायी संदर्भ, वारंवार टिपण्या, यामुळे पाठ-प्रस्तावना विस्तृत झाल्या आहेत. म्हणून शिक्षकांनी हे पुस्तक चिकित्सकपणे वाचावे; नंतरच स्वत:ला पटलेला, समर्थन करणे शक्य असलेला व स्पष्टीकरणास पात्र असलेलाच मजकूर विद्यार्थ्यांना सांगावा हे बरे. तसेच छपाईतील मुद्रणदोषही विद्यार्थ्यांच्या लक्षात आणून द्यावेत. ■





अनुक्रमणिका

# ऋषितुल्य संशोधक

सुभाष भेंडे

[ परीक्षित पुस्तक : श्री.अ.का. प्रियोळकर : व्यक्ती आणि कार्य - लेखक : डॉ. वि.बा. प्रभुदेसाई, प्रकाशक : राज्य मराठी विकास संस्था, मुंबई, २००३ पृष्ठे १२१. किंमत रु. १४०/-]

मराठी संशोधनक्षेत्रात प्रियोळकरांनी केलेलं कार्य अजोड आहे. 'दमयंती-स्वयंवरा'ची पाठशुद्ध आवृत्ती आणि 'दादोबा पांडुरंग' हा चरित्रग्रंथ सिद्ध करून यांनी या क्षेत्रात पदार्पण केलं. नंतरच्या काळात त्यांच्या संशोधन-प्रतिभेचे नवनवे उन्मेष विकसित झाले. मराठी संशोधन क्षेत्रातील 'प्रियोळकरयुग' असा यथायोग्य निर्देश करता येईल अशी कामगिरी त्यांनी केली. अथक परिश्रम, अचूक तपशील, साधार विवेचन, शास्त्रशुद्ध मांडणी आणि समतोल निष्कर्ष असे त्यांच्या संशोधनाचे विशेष होते. 'नामूलं लिख्यते किंचित्' ही त्यांची प्रतिज्ञा होती. त्यांचे निष्कर्ष मान्य नसणाऱ्यांनाही त्यांच्या विवेचनातील शास्त्रशुद्धता स्वीकारार्ह वाटे. जुनं मराठी वाङ्मय, सतराव्या शतकावरील ख्रिस्ती धर्मगुरूंचे ग्रंथ, काशीपासून रामेश्वरपर्यंत हिंडून परिश्रमपूर्वक गोळा केलेली चार-पाचशे हस्तलिखिते यांत प्रियोळकर सतत गुंतलेले असं वरकरणी दिसत असलं तरी त्यांच्या संशोधनदृष्टीला पाश्चात्य तत्त्वज्ञानाचं वावडं नव्हतं. संशोधनशास्त्रामधील इंग्रजी ग्रंथांचं परिशीलन करून त्यांनी आपल्या संशोधनाची बैठक पक्की केली होती.

अ.का. प्रियोळकर यांच्या जीवनकार्याचा विस्तृत परिचय राज्य मराठी विकास संस्थेने 'अर्वाचीन महाराष्ट्राची जडणघडण' या मालिकेतील प्रस्तुत पुस्तकाच्या द्वारा करून दिला आहे. प्रियोळकरांच्या 'स्मृतिग्रंथा'त (१९७४) त्यांच्या विविधांगी कार्याचा आढावा जाणकारांनी एकेका लेखातून घेतला होता. तरीही, त्यांचा जीवनपट व संशोधनकार्य यांचा अखंडित व तपशीलवार आढावा एकहाती घेणं आवश्यक आहे असे जाणवल्यामुळे संस्थेने ती जबाबदारी नागपूर विद्यापीठाच्या मराठी विभागाचे भूतपूर्व प्रमुख डॉ. वि. बा.प्रभुदेसाई यांच्यावर सोपवली. प्रा. प्रियोळकर





अनुक्रमणिका

डॉ. प्रभुदेसाईंच्या पीएच.डी. प्रबंधाचे मार्गदर्शक. डॉ. प्रभुदेसाईंना गुरूंची साथसंगत अनेक वर्षे लाभली. डॉक्टरेटनंतर डॉ. प्रभुदेसाईंनी केलेल्या संशोधनकार्यात त्यांना गुरुवर्यांचे सतत प्रोत्साहन मिळाले. साहजिकच त्यांनी गुरूंच्या कार्यकर्तृत्वाचा परिचय मोठ्या आत्मीयतेने करून दिला आहे.

'व्यक्ती आणि कर्तृत्व' या पहिल्या प्रकरणात लेखकाने प्रियोळकरांचा चरित्रविषयक तपशील देऊन त्यांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाची जडणघडण कशी झाली ते स्पष्ट केले आहे. त्यानंतरच्या प्रकरणांत प्रियोळकरांच्या, पाठचिकित्साशास्त्र, ख्रिस्ती मराठी वाङ्मय, मराठीच्या बोली, व्याकरण, ललितलेखन, कर्तबगार महाराष्ट्रीयांची चरित्रे आणि 'अखंड महाराष्ट्र' व 'बृहन्महाराष्ट्राची चळवळ' अशा विविध क्षेत्रांतील कामगिरीचा परामर्श घेण्यात आला आहे. अखेरच्या प्रकरणात प्रियोळकरांनी संशोधनक्षेत्रात केलेल्या लक्षणीय योगदानाविषयीचे लेखकाने काढलेले निष्कर्ष अधोरेखित करण्यात आले आहेत. तीन परिशिष्टांत प्रियोळकरांचा जीवनपट, समग्रवाङ्मयाची सूची (ग्रंथ आणि नियतकालिकांतील महत्त्वाचे लेख) आणि ठळक संदर्भसाहित्याची यादी समाविष्ट करण्यात आली आहे.

प्रा. प्रियोळकर बी.ए. उत्तीर्ण झाले होते, मात्र त्यांचा व्यासंग लक्षात घेऊन मुंबई विद्यापीठाने त्यांना एम्.ए.चे अध्यापक, इतकेच नव्हे तर पीएच.डी.चे मार्गदर्शक व डी.लिट्.चे परीक्षक म्हणून मान्यता दिली होती. इंग्रजीवर विलक्षण प्रभुत्व. 'गोवा इंन्किझिशन', 'दि प्रिंटिंग प्रेस इन इंडिया' यांसारख्या इंग्रजी ग्रंथांमुळे त्यांची कीर्ती देशाच्या सीमा ओलांडून पलीकडे गेली. युरोपीय आणि अमेरिकी विद्वानांनी त्यांच्या विद्याव्यासंगाची मुक्तकंठाने स्तुती केली. प्रियोळकरांच्या संशोधन-पद्धतीविषयी अनास्था असणारे मराठी विद्वान वेळोवेळी त्यांच्यावर कुत्सित टीका करीत. परंतु १९४८ साली 'मराठी संशोधन मंडळ' स्थापन केल्यावर संचालक म्हणून काम करताना प्रियोळकर आपल्या आवडत्या संशोधन-कार्यात इतके व्यग्र असत की छिद्रान्वेषी टीकाकारांची दखल घेण्याइतकी फुरसतही त्यांना मिळत नसे !

गाढा व्यासंग, चिकित्सक वृत्ती, हाती घेतलेल्या कामाचा सतत ध्यास ही महाराष्ट्राची परंपरा आहे. त्या तुटत चाललेल्या परंपरेतील प्रियोळकर एक ऋषितुल्य विद्वान होते. या महान व्यक्तिमत्त्वाची जडणघडण कशी झाली हे डॉ. प्रभुदेसाई यांनी अतिशय रसाळ भाषेत सांगितले आहे.

पुस्तकाची निर्मितीमूल्ये वरच्या दर्जाची आहेत. मात्र १२१ पृष्ठे असलेल्या पुस्तकाची रु.१४०/- ही किंमत अंमळ जास्त वाटते. ■

५ ज्ञानदेवी, साहित्य-सहवास, बांद्रे (पू.), मुंबई ५१. दूरध्वनी ०२२-२६५९१६०३

# चुकूर : थोडा अर्थ विचार

भगवंत देशमुख

आमचे स्नेही प्रा. डॉ. माणिक धनपलवार, यांनी 'नलदमयंती स्वयंवराख्यानात आलेला 'चुकूर' व संत तुकारामांच्या एका अभंगातील 'कर्मरी' या दोन शब्दांविषयी, आपल्या लेखात (वर्ष २२, अंक २) काही वेगळा विचार व्यक्त केला आहे.

'चुकूर' : हंस दमयंतीला म्हणतो,

''बसवुनि निज पाठी तूज नेईन तेथे । परि चुकुर तुझे हे लोक होतील येथे.''

अ.का.प्रियोळकरांनी 'चुकूर' होतील म्हणजे चकित होतील, संभ्रमित होतील असा अर्थ स्वीकारला असून, त्यासाठी अन्य उदाहरणे दिली आहेत. डॉ. धनपलवारांचे म्हणणे असे की, लोक चकित होतील याचा हंसाला संकोच वाटण्याचे कारण नसून, येथील लोक सावध होतील व पित्याच्या अनुमतीविना दमयंतीस नलाकडे नेणाऱ्या हंसास पकडतील, शिक्षाही करतील अशी त्याला भीती वाटते. 'चुकूर' म्हणजे 'सावध' या अर्थाच्या समर्थनासाठी त्यांनी दासबोधातील एकमेव उदाहरण आधाराला घेतले असून तो त्यांचा आधार मुळातच चुकीचा आहे. 'चुकूर होइजे मान्हसे । यानाव अध्यात्म' ही त्यांनी उद्धृत केलेली ओवी त्यांना कुठे मिळाली, सांगता येत नाही. बहुधा अनवधनाने किंवा आपल्या अपेक्षित अर्थास सोयीचा म्हणून त्यांनी हा 'पाठ' कल्पनेने तयार केलेला दिसतो. दासबोध दशक ३ समास ७ मधील ही ओवी मुळात अशी आहे : ''चुकूर होईजे मानसे । या नाव अध्यात्मिक''

या समासात रामदास 'त्रिविध ताप' वर्णन करताना, अध्यात्मिक,अधिदैविक आणि अधिभौतिक यांपैकी अध्यात्मिक तापाचे स्पष्टीकरण देत आहेत. आपल्या विस्तारबहुल शैलीप्रमाणे या वर्गातील अनेकविध शारीरिक पीडांची व व्याधींची नावे देऊन शेवटी 'चुकूर होइजे मानसे' हाही अध्यात्मिक तापाचा भाग होय; असे ते म्हणतात, व म्हणूनच 'या नाव अध्यात्मिक' (ताप) असे त्यांनी म्हटले आहे. साहजिकच येथे 'चुकूर' म्हणजे मन संभ्रमित होणे, भयग्रस्त होणे असाच अर्थ घेणे आवश्यक ठरते.

तेलगू-कन्नडमध्ये 'चुरुकु' हा शब्द, सावध होणे, जागृत होणे या अर्थी येतो व 'वर्णविपर्ययाने' 'चुकूर' हा शब्द आला असावा असे डॉ. घनपलवार म्हणतात. वर्णविपर्ययाने हा शब्द आला असणे संभवनीय आहे; पण त्याचा मूळ तेलगू-कन्नडमधील अर्थाने मराठीत कुठेच उल्लेख का नसावा ? शिवाय, आपल्या लेखाच्या

आरंभी ''अन्य भाषांतून आपल्या भाषेत आलेले शब्द, मुळापेक्षा वेगळ्याच अर्थाने प्रचलित होतात.'' असे त्यांनीच स्वतः सांगितले असून ते रास्त होय; तेव्हा 'चुकूर'चे मूळ जरी तेलगू-कन्नडमधील 'चुरुकू' हे मानले तरी 'सावध' हा त्याचा अर्थ सिद्ध होत नाही; कारण त्या अर्थाने त्याचा अन्यत्र कोठेच आढळ होत नाही. आणखी एक असे की दमयंतीला आपण पंखांवर बसवून घेऊन गेलो तर लोक 'पकडतील' 'शिक्षा करतील' ही भीती हंसाला का वाटावी ? आकाशपंथे गमन करणाऱ्या हंसास पकडण्याची आजच्यासारखी साधने थोडीच तेव्हा होती ? तिच्या मातापित्यांना 'चकित' 'संभ्रमित' करण्याचा त्याला संकोच वाटला, असे करणे अयोग्य वाटले हा अर्थच अधिक सुसंबद्ध होय ! ■

**'माहेर', सन्मित्र कॉलनी, औरंगाबाद ४३१००१.**

**प्रतिसाद : २**

# मराठीतील समास

**सत्त्वशीला सामंत**

श्री. दिवाकर मोहनी यांच्या 'भाषा आणि जीवन'मधील उद्धृतामध्ये (पृ. ३०, दिवाळी २००४) त्यांनी म्हटल्याप्रमाणे, शब्द जोडून लिहिणे हे समासाचे, निदान आधुनिक समासाचे व्यवच्छेदक लक्षण नव्हे. संस्कृतमध्ये एखाद्या सामासिक शब्दात कितीही घटक असले तरी ते सर्व जोडून लिहिण्याची प्रथा होती व आहे. परंतु मराठी भाषेला लांबलचक समास मानवत नाही. त्यामुळे मराठीत बहुशः दोन-तीन शब्द मिळूनच सामासिक शब्द तयार होतो. परंतु, अलीकडे अनेक संस्थानामे ही थोडी लांब असतात, म्हणून त्यांतील घटकशब्द तोडून अलग अलग लिहिण्याचा प्रघात पडला. (उदा० 'राज्य मराठी विकास संस्था') अशी संस्थानामे वाक्याच्या ओघात वापरताना, त्यांचे वेगळे अस्तित्व दाखवण्यासाठी एकेरी अवतरण-चिन्हाचा वापर करता येतो. (इंग्रजीत अशा प्रसंगी कॅपिटल अक्षरांचा वापर करतात.) मुख्य मुद्दा हा की, अर्थाअर्थी एकमेकांशी संबंध नसलेले कोणतेही चार-पाच शब्द जोडून लिहिले वा तोडून लिहिले तरी त्यांतून समास निष्पन्न होत नाही. कोट-भावना-टेबल वा कोट भावना टेबल- (श्वा, युवा आणि मघवा याप्रमाणे तिघांची सांगड घालणे)म्हणजे समास नव्हे. समासात, त्यातील घटकशब्दांमध्ये काहीतरी अर्थान्वय असणे जरुरीचे असते. ■

**१६, यशोदाकुंज, तेजस नगर, कोथरूड, पुणे ४११ ०३८. दूरध्वनी २५३८३७५५**

# महाभारत, रामायण आणि लोककथा

विश्वनाथ खैरे

'गणिका आणि राउवा' (मा.ना.आचार्य, भाषा आणि जीवन २३.१ हिवाळा २००५) या लेखातील, ज्ञानेश्वरांच्या ओवीतल्या संदर्भापासून दांडेकर-साखरे यांच्या त्या ओवीच्या अर्थापर्यंतचे सातशे वर्षांतले विविध उल्लेख एका मराठी लोककथेचे दर्शन घडवतात. दांडेकर किंवा जोग यांनी अर्थ करताना राघोबा, विठो, रामा इत्यादी ओवीत नसलेले शब्द घातले आहेत हा लोककथेच्या विकासाचाच प्रकार म्हणता येईल. लोककथेची नायिका एक गणिका आहे. तिच्या नावाशी कथा सांगणाराला किंवा ऐकणाराला काही कर्तव्य नाही. गणिकेची संस्कृत पुराणकथा महाभारत आणि भागवत या बहुमान्य ग्रंथांमध्ये आली आहे. महाभारत हे आधीचे असल्यामुळे भागवतातली कथा त्याच्यावरून घेतली आहे हे उघड आहे. दोन्ही ग्रंथांत ती मालाकथेतील एक कडी या स्वरूपात आली आहे.

महाभारतात युधिष्ठिर भीष्माला विचारतो, ''धन, दारा, पुत्र किंवा पिता गमावल्यावर बुद्धीने शोकावर कशी मात करावी ?'' त्यावर, पुत्रशोकाने पोळलेल्या सेनजित् राजाला एका ब्राह्मणाने जो उपदेश केला तो 'पुरातन इतिहास म्हणून' भीष्म त्याला सांगतो. नंतर 'पिंगलेने गायिलेल्या गाथा ऐकण्यात येतात' त्या तो पाच श्लोकांत सांगतो. पिंगलेच्या प्रियकराने तिला दिलेले वचन पाळले नाही यातून तिला आत्मा हाच खरा कंथ असल्याची जाणीव होते. 'आशेची अनाशा केल्यावरच पिंगला सुखाने झोपते' असा आत्मज्ञानपर शेवट ब्राह्मण करतो. आणि इथेच, या उपदेशाने सेनजित् सुखी झाला असे सांगून भीष्म आपले सांगणे संपवतो. मूळच्या प्रश्नापासून काहीसे दूर गेलेले हे सार आहे आणि बोधच पाहिला तर तो ईश्वरी अनुग्रहाचा नसून पिंगलेला लाभलेल्या प्रतीतीचा आहे; भक्तिमार्गापेक्षा ज्ञानमार्गाचा आहे.

भागवतात मालाकथाच पण वेगळी आहे. श्रीकृष्ण उद्धवाला उपदेश करीत आहे, त्यात यदु राजाला एका 'अवधूत' ब्राह्मणाने जे समजावून सांगितले त्याचे वर्णन आहे. त्यात पिंगला धरून चोवीस गुरूंपैकी प्रत्येकाकडून ब्राह्मण काय शिकला ते कमीअधिक विस्ताराने सांगितले आहे. 'पूर्वी विदेहनगरात पिंगला नावाची वेश्या होती' अशी सुरवात करून पिंगलेची कथा सविस्तर सांगितली आहे. मध्यरात्रीपर्यंत तिला कोणी धनिक बिछाईत मिळाला नाही. तिला उद्वेग आला. त्या उद्वेगापोटी जी जाण तिला

आली ती तेरा श्लोकांत तिने गायिली आहे. हे सांगून झाल्यावर ब्राह्मण महाभारतातल्याच शब्दांत कथेचा समारोप करतो. म्हणजे श्रीकृष्ण-उद्धवांच्या पवित्र संवादात पिंगलेला स्थान मिळाले इतकाच स्वैरिणी पिंगलेचा भागवतातील भगवंताशी संबंध आला. आणि तो संबंध दोन्ही संस्कृत पुराणकथांमध्ये ब्राह्मणाच्या मध्यस्थीने येतो. एका गणिकेला किंवा स्वैरिणीला उपरती होऊन जाणजाणीव होण्यापर्यंतच कथा जाते. स्त्रीला मोक्षाचा अधिकार नसल्यामुळे असे झालेले दिसते.

**पुराणकथा आणि लोककथा**

भागवतातल्या विस्तारित कथेचे बीज महाभारतातल्या संक्षिप्त कथेत आहे. भागवतात पिंगलेच्या रातचर्येचे वर्णन आले ते 'ती गणिका होती' या महाभारतातल्या बीजरूप उल्लेखावरून. याचप्रमाणे मागे गेले तर महाभारतातल्या कथेचे मूळही शोधता येईल.

या संदर्भात कथानायिकेचे 'पिंगला' हे नाव सूचक आहे. ते निसर्गात आढळणाऱ्या घुबडासारख्या निशाचर पाखराचे नाव आहे. पिंगळा हे नाव कोणीही मुलामुलीला ठेवण्याआधी, पाखराचे म्हणून समाजाच्या बोलीत होतेच. गणिकांचे अस्तित्वही समाजात प्राचीन काळापासून होतेच. गणिकेसाठी ते नाव सुचण्याचे रहस्य त्या पाखराच्या अंगरूपात आणि चालचलणुकीत सापडेल. पिंगळा-पिंगळीची पिसे खडीच्या साडीचोळीसारखी ठिपकेदार असतात, त्यांच्या डोळ्याभोवती बांगडीसारखी पिवळी वर्तुळे असतात. झांजर पडल्यावर ती बाहेर पडतात आणि कुंपणांच्या खांबांवरही आढळतात. पुष्कळ वेळा दोघेजण एकमेकाला बेसूर साद घालीत असतात. या प्रकारच्या निरखणांवरून गणिकांना पिंगळा म्हणण्याइतकी अर्थांतरशक्ती अनक्षर समाजांतही होती. त्यामुळे महाभारतातली पिंगलेची कथा मूळची लोकभाषेतली गणिकेची कथा होती. लोककथेचा आशय किंवा बोध व्यावहारिक पातळीवरचा होता असेल.

ती कथा संस्कृत काव्यांमध्ये लोकभाषी कवींनी घातली. तरी समाजात लोककथेच्या धारेने ती प्रचलित राहिलीच. भारतीय समाजातल्या सांस्कृतिक संचिताच्या या दोन समांतर धारा म्हणता येतील. ज्ञानेश्वरांसारखे कवी संस्कृत ग्रंथांचे निरूपण करतात तेव्हा या दोन्ही धारांचा ते भरपूर उपयोग करतात. गणिकेच्या लोककथेला नामस्मरणातून होणाऱ्या मोक्षप्राप्तीची जोड लोकसंचितातून आलेली दिसते.

लोकसंचितातल्या अनेक कथा संस्कृत महाकाव्यांत वगैरे आल्या असल्या तरी सगळ्या आल्या आहेत असे मात्र नाही. तुकारामगाथेतल्या 'गंधर्व आणि सोम...' या अभंगात 'गणिका अजामेळ पिंगळा' यांच्यापुढेच 'वाल्हा विश्वामित्र वसिष्ठ नारद'

यांचाही उल्लेख आला आहे. यातल्या 'वाल्हा'ची म्हणजे वाल्मीकीचे पूर्वरूप असलेल्या वाल्ह्या कोळ्याची कथा संस्कृत रामायणात नाही.

लोककथेतल्या वाल्ह्या कोळ्याला नारदाने त्याच्या धंद्यातला 'मरा मरा' हा जप सांगून त्याच्या मुखी रामनामाचा जप घडवला. दक्षिणी भाषांमध्ये ही कथा थोडी बदललेली आहे. वाल्ह्या जंगलात वाटमारी करीत होता. तेव्हा नारदाने त्याला जंगलातल्या प्रत्येक झाडाला हात लावून 'झाड, झाड' या अर्थाचे 'मरा मरा' हे शब्द रटायला सांगितले. संस्कृतात 'मरा' हा शब्द अशा संदर्भाचा नसल्याने त्याच्या जपाची कथा घालणे शक्यच नव्हते.

गणिकेच्या शोधाच्या संदर्भात वाल्ह्याच्या कथेविषयीची ही वस्तुस्थिती लक्षात घेतली पाहिजे. गणिकेने पाखराच्या नावातून देवाचे घेतले ते राघू किंवा विठू हे नाव संस्कृत काव्यात येणे शक्य नव्हते. राघूचे संस्कृत नाव शुक हे त्याच्या वाणीवरून आधीच ब्रह्मचारी मुनीचे म्हणून पक्के झाले होते. मात्र दुसऱ्या पक्ष्याच्या नावावरून कल्पिलेले पिंगला हे नाव त्यात चालत होते. त्यामुळे गणिकेची लोककथा पिंगलेची म्हणूनच महाभारतात येऊ शकली.

लोकभाषांतले शब्द जसे संस्कृत भाषेत गेले तशाच लोककथाही पुराणकथा म्हणून संस्कृत महाकाव्यात समाविष्ट झाल्या. भाषिक रूपांतराबरोबर त्यांच्या कथानकांत आणि आशयांतही रूपांतरे झाली. पुन्हा संस्कृत कथाही काही पालट होऊन लोकभाषांमधे येत राहिल्या. कथांचा हा उलटसुलट प्रवास ध्यानात घेतला तर प्रस्तुत ओवीतली 'पोपट पाळणारी गणिका म्हणजे भागवती कथेतील पिंगळा नव्हे'ही आणि आहेही असे म्हणावे लागेल ! ■

**३७४, सिंध सोसायटी, औंध, पुणे ४११ ००७**

## निवेदन

'लोकभाषा आणि संस्कृत' या विषयावर भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिरात मंगळवार १९ एप्रिल २००५ रोजी दुपारी ३ ते ६ या वेळात चर्चासत्र होणार आहे. 'लोकभाषा आणि संस्कृत' ही चर्चेच्या बीज-निबंधाची पुस्तिका छापलेली आहे.'

चर्चासत्रात सहभागी होऊ इच्छिणारांना, 'विश्वनाथ खैरे, ३७४, सिंध सोसायटी, औंध पुणे ४११००७', या पत्त्यावर कार्ड पाठवल्यास ही पुस्तिका विनामूल्य मिळू शकेल.

## 'भाषा आणि जीवन'कडे परीक्षणासाठी आलेली पुस्तके

१. **अभिनव मराठी-मराठी-इंग्रजी पर्याय-शब्दकोश**
   *वि. शं. ठकार,* मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे
२. **मराठी वाङ्मयकोश** - खंड ४ : समीक्षा-संज्ञा, संपा. *विजया राजाध्यक्ष,* महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई
३. **प्राजक्त** *कुसुम रेगे,* प्रियांजली प्रकाशन, पुणे
४. **मराठी भाषा : स्वरूप आणि उपयोग** *यशवंत कानिटकर,* फडके प्रकाशन, पुणे
५. **वाचू आनंदे** बाल गट : खंड १ व २, कुमार गट : खंड १ व २
   संपा. *माधुरी पुरंदरे,* ज्योत्स्ना प्रकाशन, पुणे व राज्य मराठी विकास संस्था, मुंबई
६. **हद्दपारीच्या वाटेवर मराठी** संपा. *प्रभाकर बागले,* अनुष्टुभ प्रकाशन, मुंबई
७. **मराठी भाषेचा इतिहास** *गं. ना. जोगळेकर,* श्रीविद्या प्रकाशन, पुणे
८. **दामू देववाग्याची दुनिया** *डॉ. यशवंत रायकर,* अयपा प्रकाशन, विरार
९. **कलेची मूलतत्त्वे** *आर. जी. कॉलिंगवुड,* भाषांतरकार : *स .गं. मालशे, मिलिंद मालशे,* महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई
१०. **सामाजिक भाषा विज्ञान : कक्षा आणि अभ्यास**
   संपा. *जयश्री पाटणकर,* ससंदर्भ प्रकाशन, नाशिक
११. **मराठी भाषा-अध्यापनातील क्षेत्र-प्रयोग** *राजकुँवर सोनवणे,* अनुबंध प्रकाशन, पुणे
१२. **जागरूक वर्गशिक्षक** *राजकुँवर सोनवणे,* अनुबंध प्रकाशन, पुणे
१३. **तंजावर आणि महाराष्ट्र** *माणिक धनपलवार*
१४. **वाळूच्या पात्रात मांडलेला खेळ** *अनुराधा पाटील,* तुला प्रकाशन, औरंगाबाद
१५. **सूफी प्रार्थनांच्या किनाऱ्यावरून** *श्रीधर नांदेडकर,* तुला प्रकाशन, औरंगाबाद
१६. **तत्पुरुष** *कविता महाजन,* तुला प्रकाशन, औरंगाबाद
१७. **भाषणरंग** *अशोक रानडे,* पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
१८. **भाषण व नाट्यविषयक विचार** *अशोक रानडे,* पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
१९. **वाचिक अभिनय** *डॉ. श्रीराम लागू,* राजहंस प्रकाशन, पुणे
२०. **डॉ.देवीसिंग चौहान गौरव ग्रंथ** संपा. *सु.ग. जोशी,* मराठवाडा संशोधन मंडळ, लातूर
२१. **आपुलाचि वाद** *मोहन कद्रू,* साकेत प्रकाशन, औरंगाबाद
२२. **पृथ्वीवरील प्रतिभावंत** अनु. *भगवान ठग,* महाराष्ट्र अनुवाद परिषद प्रकाशन, बुलढाणा
२३. **थाई भाषा शिका** *डॉ. एन्.जी. बापट,* नितीन प्रकाशन, पुणे
२४. **मराठी शारदियेच्या चंद्रकळा** संपा. *सुमन बेलवलकर,* भारतीय भाषा संस्थान, मैसूर
२५. **ॲन इन्टेन्सिव कोर्स : रीडर इन मराठी** *विजया चिटणीस, सुमन बेलवलकर*
२६. **लर्निंग मराठी ॲज अ फारिन लँग्विज** ( मोड्यूल २ ) *नीती बडवे,* अक्षर साहित्य प्रकाशन, पुणे

लेखक परिचय

- विवेक भट हे रासायनिक अभियंता असून वयाच्या पन्नाशीनंतर संस्कृत व भाषाविज्ञान या विषयात एम्.ए. सध्या भाषाविज्ञानात पीएच.डी.साठी संशोधन करीत आहेत.
- डॉ. मिलिंद मालशे हे इंग्रजीचे प्राध्यापक असून इंग्रजी व मराठीत लेखन करतात. ते हिंदुस्थानी शास्त्रीय संगीताचे अभ्यासक व गायक आहेत.
- उज्ज्वला बर्वे पुणे विद्यापीठाच्या संज्ञापन आणि वृत्तपत्र-विद्या विभागात अधिव्याख्याता आहे.
- डॉ. दिलीप धोंडगे सटाणा येथील कर्मवीर सोनवणे महाविद्यालयातील मराठी विभागाचे प्रमुख आहेत.
- डॉ. विद्यागौरी टिळक पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात प्रपाठक आहेत.
- डॉ. जयश्री पाटणकर नाशिकच्या इं.प्रा.ठा. (एन्.पी.टी.) महाविद्यालयातील मराठी विभागाच्या प्रमुख आहेत.
- डॉ. सुभाष भेंडे मुंबईच्या कीर्ती महाविद्यालयातून अर्थशास्त्राचे प्राध्यापक म्हणून निवृत्त झाले. अ.भा.मराठी साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष. कादंबऱ्या, कथा इ. ललित लेखन. विश्वकोश व अन्य ठिकाणी अर्थशास्त्रासंबंधी लेखन, संपादन.
- विश्वनाथ खैरे केंद्रीय बांधकाम खात्यातून अभियंता म्हणून निवृत्त. संस्कृत, मराठी, तमिळ ('संमत')यांच्या आंतरसंबंधांचा विशेष अभ्यास. प्राचीन मिथ्यकथा, प्राचीन भारतीय संस्कृती व परंपरा या विषयांसंबंधी लेखन.

---

**मुखपृष्ठासंबंधी :** विविध ऋतूंमध्ये निसर्गात होणाऱ्या बदलांचा चित्ररूप मागोवा घेण्यासाठी अक्षरांच्या साह्याने वातावरणनिर्मिती केली आहे. ही अक्षरे पूर्णपणे नवनिर्मित असून संगणकावरच घडली आहेत. म्हणजेच यात पारंपरिक लेखन-साधनांचा वापर अजिबात केलेला नाही. आजच्या 'संगणक-युगा'त सौंदर्य-निर्मितीसाठी संगणक वापरतानाच संगणकामुळे सहजसाध्य होणाऱ्या कलात्मक परिणामांमुळे आपल्याही दृश्यकलाविषयक जाणिवा समृद्ध होत आहेत.

---

प्रकाशन : **त्रैमासिक;** जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे.
वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १२५/- फक्त, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५०/- फक्त
व्यक्तीला रु. १००/- फक्त, पंचवार्षिक वर्गणी रु. ४५०/- फक्त
परदेशात अंक पाठविण्यासाठी टपालखर्चासाठी रु. १००/- अधिक पाठवावेत.

(२) **आजीव वर्गणी :** मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १,०००/- आणि नोंदणी शुल्क रु. १००/- फक्त.**

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत रुपये २०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **मागील अंक :** 'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) काही अंकांचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/- आणि २००२ पासून प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-.

(५) **जाहिरातीसाठी दर :** पूर्ण पान रु. ७५०/-, अर्धेपान रु. ४००/-, पाव पान रु. २५०/- शुभेच्छा सूचना रु. १००/-, आवरण पृष्ठ तीन व चार रु. ८००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

R. N. I. नोंदणी क्रमांक : ० - ४००४८/८३

बुकपोष्ट - बुकपॅकेट - त्रैमासिक
या अंकाची किंमत रु. २५/-



प्रेषक
**कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद**
३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, गल्ली क्र. ५,
वाडिया हॉस्पिटलसमोर,
पुणे ४११ ००२. (दू. क्र. २४४८६०१५)






अनुक्रमणिका